तिच्यांतून प्रतीत होतो त्याच्याच अनुरोधानें विवरण करण्यास हरकत नाहीं. ती कविता परत उद्धृत करणें आवश्यक आहे :

Music, when soft voices die,
Vibrates in the memory—
Odours, when sweet violets sicken,
Live within the sense they quicken.
And so thy thoughts,
when thou art gone
Love itself shall slumber on.

' तूं निघून गेल्यावर तुजविषयींच्या विचारांतच माझें प्रेम चिंतनमग्न होईल ' असें कवि आपल्या प्रेयसीला सांगत आहे. हा आशय कवीला केवळ ' sweet violets sicken ' या शब्दांमुळें आणि ' sicken ' व ' quicken ' या यमकामुळें सुचला असें म्हणतां यावयाचें नाहीं. तो आशय स्फुरण्याकरितां त्या आशयाचा भाव कवीच्या अंतर्मनाच्या गाभ्यांत पूर्णपणें रसरसून गेला असला पाहिजे हें उघड आहे. परंतु श्री. रेगे शेलीच्या ' मनांत जरी कांहीं होत असलें, तरी ' sicken ' व ' quicken ' या जोडीवरच सारा भर देतात.' वस्तुतः हें यमक काव्याच्या मूळ कल्पनेला पोषक अशा उपमेंतील आहे. केवळ उपमेवरून किंवा यमकावरून शेलीला मूळ कल्पना स्फुरली असें म्हणवत नाहीं. विरहकालांत कवीच्या मनाला चिंतनसमाधींत मग्न ठेवणारें प्रेयसीचें अशरीरी सान्निध्य, मंजुमधुर गानस्वर निमाल्यानंतर स्मृतीच्या अवकाशांत उठणारे निनाद व तरंग, आणि फुलें सुकल्यावरहि सर्वत्र दरवळत राहून मनाला वेडावून सोडणारा पुष्पसुगंध–या सान्या कल्पना शेलीच्या अंतर्मनांत भावरूपानें अत्युत्कट स्वरूपांत वावरत होत्या असेंच म्हणणें योग्य होईल.

या बाबतींत खुद्द शेलीची साक्ष काढली तर काय दिसेल तें पाहाण्यासारखें आहे. तो आपल्या Defence of Poetry या निबंधांत म्हणतो : "A man cannot say, ' I will write poetry.' The greatest poet even can not say it : for the mind in creation is a fading coal, which some invisible influence, like an inconstant wind, awakens to transitory brightness...When composition begins, inspiration is already on the decline, and the most glorious poetry that has ever been communicated to the world is probably a feeble shadow of the original conception of the poet. "

यावरून कविमनाची काव्यस्फूर्तीच्या वेळची स्थिति लक्षांत येतेच. पण शब्दाकार झालेली कविता कवीच्या मनांत आधींच वसत असलेल्या काव्यकल्पनेची क्षीण छाया असते असेंहि दिसून येतें. शब्द स्फुरण्यापूर्वीं कविमनांत मूळ काव्याचा भाव असतो. हें आणखी बघावयाचें झाल्यास शेलीनें ' Defence of Poetry ' या निबंधांतच कवितेची केलेली एक व्याख्या लक्षांत घेण्यासारखी आहे. काव्य म्हणजे : " The creation of actions, according to the unchangeable forms of human nature as existing in the mind of the creator, which is itself the image of all other minds " असें तो म्हणतो.

## स्वरालाप केवळ सहायभूत

यावरून हें लक्षांत येईल कीं, फक्त ' केवल-काव्यां'तहि शब्दाला प्राधान्य नाहीं. कारण शब्दाचा अर्थ हा कविमनांत आधींच असतो आणि तो कवितेवाटें फक्त शब्दरूप होतो. हें त्याचें शब्दरूप होणें म्हणजेच communication किंवा अभिव्यक्ति. ती जितकी यशस्वी तितकें तें काव्य उत्कृष्ट ठरतें. ती अभिव्यक्ति नीट व्हावी म्हणूनच त्याच्या मनांत हुरहूर व तळमळ चालते, तो विकल होतो, गहिंवरतो. आणि अभिव्यक्ति चांगली होऊं लागली, मूळ भाव शब्दरूपांत अवतीर्ण होऊं लागला कीं तो धुंद होतो, बेहोष होतो. काव्यांत










अभिव्यक्तीला किंवा शब्दांना फार महत्त्व असतें तें यामुळेंच. शब्द ही गूढ शक्ति असते म्हणून नव्हे !

केवळ स्वरालाप किंवा केवळ नादांची संगति हा ' केवल-काव्या 'चा श्रेष्ठ आविष्कार असला, त्यांतून जरी आपण नवीन अर्थ काढूं शकत असलों, तरी गायक स्वर काढतांना किंवा वादक वाजवितांना आपलें हृदयसर्वस्व, अंतर्मनांत उफाळून येणारे भावच त्यांत ओतीत असतो. याचाहि अर्थ स्वरापाला किंवा नादससंगीताला आधीं ' अर्थ असतोच असा होतो.

यमकांविषयींहि असेंच विवरण करावें लागेल. शब्दांची पकड यमकद्वारें अधिक प्रभावीपणें जाणवते हें खरें आहे. केवळ यमकांचा हव्यास असणें हा दोष यमकांचा नसून यमक्यांचा आहे हें म्हणणेंहि योग्य आहे. आणि शब्दांच्या ध्वनि-प्रतिध्वनींच्या संगतीमुळें विलक्षण आनंद व्हावा यांतहि चूक नाहीं. मात्र त्याचा अर्थ एवढाच कीं ध्वनि-प्रतिध्वनींची साथ मूळच्या कल्पना किंवा शब्द यांचा अर्थ उकलून दाखविण्यांत सहायभूत ठरतात. उत्तमोत्तम इंग्रजी काव्यांत तर यमकांचा आढळ फारच कमी प्रमाणांत असतो. संस्कृतां-तील ललित काव्य हें सारें निर्यमकच आहे हें येथें लक्षांत घेण्यासारखें आहे. यावरून मूळ कल्पना किंवा काव्य ध्वनि-प्रतिध्वनींवरून किंवा यमकांवरून स्फुरतें असा अर्थ होत नाहीं. म्हणजेच ' आधीं शब्द, मग अर्थ ' असें नसून आधीं ' अर्थ व मग शब्द ' असेंच आहे.

---

# विंझणवारा

तो हा विंझणवारा !
यौवनांतले सरुन उमाळे
पोटासाठीं श्वान जाहले
पिउन निराशा विगलित उरले
त्यांच्या उरिंचा फुंकर घालुन
फुलवी गुप्त निखारा
तो हा विंझणवारा !

स्वप्नमण्यांच्या झाल्या कांचा
उरांत रुतला दोर करकचा
फेंस मुखांतुन ये रक्ताचा
द्रोणागिरितुन त्यांच्यासाठीं
आणित जीवनधारा !
तो हा विंझणवारा !

जे विरहाची ज्वाला प्याले
दऱ्यादरकुट्या वणवण फिरले
' मेघालोके ' व्याकुळ झाले—
अशोकवनिंची वार्ता आणित
लंघुन सातसमुद्रां
तो हा विंझणवारा !

विरहिणीस हो लाहिकाहिली
अधरींची मावळली लाली
घांस उचलुनी ठेवी खालीं
अवचित येतां पत्र सख्याचें
त्यांतुन दरवळणारा !
तो हा विंझणवारा !

फुटे सुकाणूं, शीड फाटलें
डगमग डगमग नौका चाले
भवितव्यानें डोळे मिटले
भीषणास या हांसत अवचित
' आला '—म्हणे ' किनारा ! '
तो हा विंझणवारा !

हा मम अंगीं आज लहरतो
जीवनकुसुमीं सुगंध भरतो
द्राक्षमळ्यांचें स्वप्न फुलवितो
डाळिंबाच्या सुमगर्भीतुन
हुंगितसे फलभारा
तो हा विंझणवारा !

—शांताराम रामचन्द्र












श्री. माधवराव बागल

# अमरत्व

माझें हें अध्यात्मवादी प्रवचन नव्हे. ईश्वराचें अस्तित्व आणि आत्म्याचें अमरत्व सिद्ध करण्याचा हा खटाटोप नव्हे. प्रयत्न करूनहि त्या ईश्वराचा शोध मला लागला नाहीं. तो न लागल्यानें मी दुःखी झालों नाहीं, माझें कुठेंच अडून बसलें नाहीं, माझा धरबंद सुटून मी कांहीं चोरी दरोड्याला प्रवृत्त झालों नाहीं !

आत्मा आहे कीं नाहीं याचा काथ्याकूट मी करूं इच्छीत नाहीं. आत्मा म्हणजे काय याची फोड जर शास्त्रशुद्ध रीत्या आतांपर्यंत कुणाला करतां आली नाहीं, तर त्याच्या अमरत्वाची चिकित्सा करण्यांत माझ्यासारख्यानें कशाला वेळ घालवावा ? मी सामान्य माणूस. माझ्यासारख्या सामान्य माणसाला जें पटेल आणि जें पटवून देतां येईल तेंच बोलावें आणि लिहावें हेंच बरें नाहीं का ?

पण अमरत्वाची कल्पनाच साफ कीची असें मात्र मी मानीत नाहीं.

आपण मेलों कीं जग बुडालें असें समजून मात्र कोणी वागत नाहीं. देह गेला तरी आपलें सर्वच कांहीं नष्ट होणार नाहीं, या समजुतीनेंच मनुष्यप्राणी वागत असतो.

मी जडवादीच आहे, पण अमरत्वावर माझा विश्वास आहे. या अमरत्वावर विश्वास बसण्याजोगी गोष्ट एकदां माझ्या डोळ्यांसमोरच घडली.

पन्हाळ्यावरच्या तुरुंगांत मी त्या वेळीं होतों. एका जुनाट वाड्यांत आम्हांला डांबून ठेवलें होतें. माझ्या बसल्या जागेवरून मला एक झाड दिसत असे. सभोंवार भिंतीच असल्यामुळें वाऱ्यावर डुलणाऱ्या पानांवर सहजींच माझी नजर ठरत असे. कां कोण जाणें, त्याच झाडाच्या पानांचा आवाज नेहमीं विशेष ऐकूं येई. त्यामुळें त्या झाडानें माझ्या मनांत एक विशेष कुतूहलाचें स्थान पटकाविलें होतें.

रात्रीं मी सोप्यांत झोपत होतों. एके दिवशीं खूप सोसाट्याचा वारा सुरू झाला. पांघरूणहि विस्कटलें. त्या झाडाचा तर मला भयंकर राग आला. त्याचीं पानें इतका आवाज करूं लागलीं कीं मला झोप येणें अगदीं अशक्य झालें. पानांची फडफड सारखी चालू होती. निष्क्रिय अध्यात्मवाद्याची वायफळ बडबडच जणूं !

थकून थकून मला अखेर झोप लागली. पहांटे सहजींच झाडाकडे दृष्टि गेली. तों काय ! अगदीं आश्चर्याची गोष्ट ! ज्यांनीं मला रात्रभर झोप पडूं दिली नव्हती, तीं सर्व पानें झाडावरून गळून पडलीं होतीं. एकहि पान शिल्लक नव्हतें. झाडाचा बुंधा आणि बारीकसारीक फांद्या तेवढ्या दिसत होत्या !

या दृश्यानें त्या झाडावरचा माझा राग कमी झाला. त्याची कींव आली मला. सुंदर इमारत जळून नुसते खांब तेवढे शिल्लक राहावेत, तसें दिसत होतें. त्याचें सर्वच ऐश्वर्य लयाला गेलें होतें. हालचाल बंद पडली होती. जीव तरी होता कीं नाहीं कोण जाणें ! डोळ्याला नुसत्या काट्या भेडसावीत होत्या.

रात्रीं कसला त्रास झाला नाहीं, आवाज झाला नाहीं. पण त्यामुळें मनाला मात्र समाधान झालें नाहीं. स्मशानशांततेचा भास झाला. भरलेल्या बाजारांतील गोंगाट ओसरतांच उदास वाटतें तसें मला झालें.

दुसरा दिवस उजाडला. आज त्याहूनहि आश्चर्याचें, पण आल्हाददायक दृश्य दिसलें. तें आश्चर्य आनन्दाचें व कुतूहलाचें होतें. माझ्या चेहऱ्यावर आपोआपच हास्य उमटलें. बाल-

जीवाच्या पाळण्यांतल्या गोंडस हातवाऱ्यांनीं व कोमल पायाच्या चाळ्यांनीं अंतःकरणाला गुदगुल्या व्हाव्यात ना, तसें झालें मला ! एकाच रात्रीं त्या फांद्यांना कोवळी कोवळी पालवी फुटली होती. त्यांची हालचाल ! जणुं काय गोजिरवाणी मुलें हंसऱ्या हावभावांनीं मला बोलावीत आहेत. मुलांच्या इवल्याशा हातांप्रमाणें तीं पण लाल दिसत होतीं. त्यांची वाढ किती झपाट्यानें होत होती !

तिसऱ्या दिवशीं झाड पानांनीं फुलून गेलें, त्यांचे ते लाल लाल नाजुक ओठ, बोबडे बोल बोलूं लागले. मला मोह आवरला नाहीं. त्या प्रत्येकांची मी पटापट चुंबनें घेऊं लागलों. सर्वत्र हास्यध्वनि उमटला.

सर्व झाड जडजवाहिरांनीं भरून निघालें. बारशाचा थाटमाट चालू झाला. पक्षिगणांनीं सुस्वर गायनाला सुरुवात केली. आया-बायांचे भरजरी शालू चमकूं लागले. सर्वत्र आनंदी-आनंद.

गळलेल्या पानाचें दुःख विसरलें गेलें ! तेथें नवी पालवी फुटली होती ! गेल्या पिढीच्या जागीं नवी पिढी आली होती ! डोळ्यांसमोरच झाडाचीं वाळलेलीं जुनीं पानें गळून पडलीं. तेथें दुसरी त्याहून सरस जोमदार पालवी फुटली. त्या दोन्ही पल्लवींचा आधारभूत वृक्ष कायम होता ! त्याचाहि काल संपला कीं नवीं रोपें उगवणार ! पूर्वीच्यांना मागें टाकून तीं पुढें सरकणार !

माणूस मर्त्य असला तरी मानववंश अमरच नाहीं का ? तो कुठें नाश पावतो ? एक गेला त्याच्या ठिकाणीं दुसरा येतो. एक पिढी गेली, दुसरी पिढी येते. तिचें राहिलेलें काम पुरें करून, पुढचें पाऊल टाकते !

जड अमर आहे. फक्त त्याचें रूपांतर होत आहे. पण तेंहि प्रगतिपर आहे. त्याची सारखी वाढ होत आहे. मानवी समाजाचा विकास होत आहे. जड अमर आहे पण स्थिर नाहीं. मनुष्य या अमरत्वाच्या कल्पनेला चिकटून आहे, म्हणूनच तो मरणाला भीत नाहीं. युद्धांत कोट्यवधी माणसें जीं मरणाला स्वखुषीनें कवटाळतात तीं याच कल्पनेमुळें, अमरत्वाच्याच विश्वासामुळें ! असंख्यांचा बळी देऊन स्टालिनग्राड लढविलें तें कुणासाठीं ! भावी पिढीसाठींच ना ! भगतसिंग हंसतमुख फांसावर चढला, तें स्वातंत्र्यासाठींच ना ? तें स्वातंत्र्य कां त्याला मिळणार होतें ! ज्युलियस फ्युसिकनें तुरुंगांत ज्या यमयातना भोगून प्राण टाकला, तो भावी पिढी गुलामगिरींतून मुक्त व्हावी म्हणूनच ना ? देह नष्ट झाला कीं संपलें असें वाटत असतें तर ध्येयवादी माणसें जगांत दिसलीं नसतीं, खिस्तानें आपला बळी दिला नसता, सॉक्रेटीस अन् गॅलिलिओ आपल्या मताला चिकटून राहिले नसते ! संशोधकांनीं लावलेले शोध, निःस्वार्थी वीरांनीं केलेली देशसेवा, विद्वानांनीं समाजाला दिलेले ज्ञानग्रंथ आणि कलावंतांनीं निर्माण केलेल्या कलाकृती हीं सर्व त्या अमरत्वाच्या विश्वासामुळेंच. प्रत्येक माणूस आणि समाज भावी पिढींत कार्याची सांगता अबाधित ठेवीत असतो. आई-बाप आपल्या मुलांत आपलें अस्तित्व आहे असें मानून मरण्यास तयार होतात. याच भावनेमुळें संस्कृतीचें संरक्षण झालें आहे, मोठमोठ्या योजना राष्ट्र पार पाडीत असतें.

भावी पिढीसाठीं आहुति देणें म्हणजेच अमर होणें होय. ही आहुति जाणतेपणानें करण्यांतच मनुष्याचें वैशिष्ट्य आहे. किडा-मुंगीला ही जाणीव नसते. मनुष्याला ती असते. म्हणून प्रत्येक पिढीगणीक त्याचा विकास होत आहे. तो जाणूनबुजून विचारपूर्वक विकास करीत आहे. याचमुळें तो विश्वकुटुंबाकडे व विश्वशांतीकडे चालला आहे.

जगावर विश्वास आहे, जडावर विश्वास आहे, म्हणूनच ही प्रगति होत आहे. जग मिथ्या आहे, जग माया आहे असें म्हणणाऱ्या आणि मानणाऱ्यांच्या हातून मात्र जगाचें पाऊल पुढें गेलेलें नाहीं. त्यांनीं प्रगतीला खीळच घातली आहे ! जडाच्या अमरत्वावर त्यांचा विश्वास नाहीं !










ग्रंथपरिचय : श्री. दि. के. बेडेकर

# ' मऱ्हाटी संस्कृति '

' मऱ्हाटी संस्कृति ' या ग्रंथांतील मुख्य प्रमेय असें आहे कीं, आर्यपूर्व भारतांतील ' हट्ट ' नांवाच्या लोकसमूहानें नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत एक संस्कृति नांदविली; आजचे मराठे व कानडी लोक यांचें पूर्वजीवन अभिन्नत्वानें या संस्कृतींत पोसलें गेलें; नंतर आर्यांनीं दक्षिणापथांत प्रवेश केल्यामुळें हट्टजनांच्या संस्कृतीचें आर्यीकरण सुरू झालें व हळूहळू मराठी व कानडी लोकांची भाषा, दैवतें, आचार व स्वभाव यांचें द्वैत निर्माण होऊं लागलें. यादवकालापर्यंत हें द्वैत पूर्ण झालें व सहोदर अशा मराठी-कानडी संस्कृतींमध्यें वेगळेपणाबरोबरच स्पर्धा व तेढहि उत्पन्न होऊं लागली. ' हट्ट ' जन हे वेदकालीं आर्यांशीं संबंध आलेले ' पत्ति '-जन असावेत असा अंदाजहि ग्रंथकर्त्यानें मांडला असून, अनुषंगानें आर्य-द्रविड संस्कृतींच्या संगमाची व विग्रहाची चर्चा केली आहे. ' महाराष्ट्र ' हें देशनाम मुळांत ' मर ' व ' हट ' या आर्यपूर्व शब्दांवरून व ' मऱ्हाट ' या पूर्वरूपांपासून बनविलें गेलें आहे अशी व्युत्पत्ति त्यांनीं मांडली आहे.

श्री. जोशी यांच्या ग्रंथाच्या आशयाची ही रूपरेषा पाहतांच लक्षांत येईल कीं, त्यांनीं मांडलेल्या प्रमेयांचा सहज स्वीकार होणें जसें दुरापास्त होईल, तसेंच त्यांची सवंग हेटाळणी करणेंहि अनुचित ठरेल. ज्ञात इतिहासाच्या जरा मागें गेल्यावर जो अज्ञात अशा प्राचीन जनांचा, देशनामांचा व भाषांच्या पूर्वरूपांचा इतिहास आहे त्याबद्दल आज फक्त अनुमानें व विचारार्ह प्रमेयें मांडणें एवढेंच संशोधकाला शक्य असतें. आर्यांच्या मूळ वसतिस्थानाबद्दलचा लोकमान्यांचा सिद्धान्त घ्या किंवा मोहेन-जो-दारोच्या रहिवाश्यांच्या भाषेबद्दल, दैवतांबद्दल किंवा जीवनक्रमाबद्दल करण्यांत आलेले तर्क घ्या; जेव्हां हे सिद्धान्त किंवा तर्क मांडण्यांत आले, तेव्हां संशोधकांनीं अनुमानाचा पाया म्हणून घेतलेला पुरावा व त्याच्यावर उभी केलेली इमारत भक्कम वाटली, पण थोड्यांच अवधींत त्या पुराव्यालाच रद्द ठरविणारी माहिती पुढें आली. ग्रहस्थितीवर आधारलेली कालगणना किंवा कथा-स्तोत्रादि वाङ्मयावर रचलेलीं समाजस्थितींचीं अनुमानें यांचे दुवे तर फारच कच्चे ठरतात. परंतु उत्खननादिद्वारां उपलब्ध होणाऱ्या अवशेषांच्या आधारावरहि निश्चित अनुमानें काढणें या अज्ञात मानवेतिहासाच्या क्षेत्रांत शक्य झालेलें नाहीं. कारण, शेवटीं अवशेष पार्थिव असले तरी त्यांच्या मूळ स्वरूपाचा व कार्याचा अर्थ लावण्याचा प्रश्न राहतोच.

श्री. जोशी यांच्या ग्रंथांतील प्रमेयांची रचना मुख्यतः भाषाशास्त्र व तदनुषंगिक अनुमानपद्धति यांच्यावर आधारलेली आहे. अर्थातच या शास्त्राला प्राचीन अज्ञातांत शिरण्याचें एक प्रमुख साधन म्हणून आजपर्यन्त मोठें स्थान लाभलें आहे. परंतु अग्नि हा जितका उपयोगी तितकाच विघातक ठरूं शकतो तसेंच संशोधनाच्या या साधनाचेंहि दुहेरी स्वरूप आहे हें विसरतां येत नाहीं.

अतिप्राचीन इतिहासाच्या संशोधनामधील हे सर्व धोके व अनिश्चितता ओळखून जिज्ञासु व विनम्र वृत्तीनें आपलीं प्रमेयें लोकांपुढें मांडणारा संशोधक जें मांडील तें उद्यां खरें ठरो वा न ठरो; त्याचें संशोधनकार्य हें नेहमींच अभ्यसनीय असेंच राहील. अशा आदराला सर्वस्वीं पात्र असलेल्या ग्रंथकर्त्याचा प्रस्तुत ग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध झाला आहे याचें मुख्य श्रेय ग्रंथकर्त्याला आहे. त्याबरोबरच प्रकाशनाची जबाबदारी अंगावर घेणाऱ्या ' आंतरभारती ' या संस्थेच्या प्रमुखांनाहि आपण सर्वांनीं धन्यवाद दिले पाहिजेत.

सुरुवातीसच दिलेल्या सारांशावरून वाचकांना कळून आलेलें आहेच कीं, श्री. जोशी यांच्या

---

' मऱ्हाटी संस्कृति ' ( कांहीं समस्या )–लेखक : श्री. शं. बा. जोशी
आंतर-भारती-प्रकाशन : १ : पुणें २ ( १९५२ ). पानें २२५. किं. ५ रु.








संशोधनांतील नावीन्य व महत्त्व खालील तीन प्रमेयांमध्यें आहे :

( १ ) मराठी व कानडी संस्कृतींचा आर्यपूर्व अशा हट्टजनसंस्कृतीमधून उद्गम.

( २ ) 'पडु' या तामिळ धातूपासून निघालेल्या पट्टि-हट्टि-वाडी अशा स्थलवाचक संज्ञांच्या अनुसंधानानें 'मरहाट' या देशनामाची सिद्धि व या पूर्वरूपापासून मऱ्हाट-वऱ्हाट-'विदर्भ', तसेंच 'महाराष्ट्र' या संस्कृत पेहरावांतील देशनामांची व्युत्पत्ति.

( ३ ) 'वेद–व-महाभारतकालीन यदु-तुर्वसु, अशोककालीन रिष्टिक-भोजक, रामायणकालीन ऋषिक-भोजक व मूळ हट्टिकार ( कण्णजन व मरहट्टे )' अशी हट्टजनांची अखंड परंपरा दाखविली आहे. आतां या तीन प्रमेयांची जास्त ओळख यापुढें मी करून देत आहे.

मराठी व कानडी संस्कृतींच्या जुळेपणाचें म्हणजे एकाच पूर्वरूपापासून झालेल्या त्यांच्या उद्गमाचें प्रमेय प्रस्तुत ग्रंथाचा गाभा समजावा लागेल. हें प्रमेय स्वीकारण्यासारखेंच आहे असें मला वाटतें. तसें पाहिलें तर, अनेक पूर्वसूरींनीं ह्याच निर्णय पूर्वीच देऊन ठेवलेला आहे. त्यांचें ऋण ठिकठिकाणीं आदरानें नमूद करूनच श्री. जोशी यांनीं या प्रमेयाच्या पुष्टीसाठीं भाषाविषयक, दैवतविषयक आणि इतर बराच पुरावा सादर केला आहे.

मुख्यतः भाषेचा प्रश्न घेतला तर न्यायमूर्ति रानडे, स्टेन कुनो, ग्रिअर्सन, गोविंद पै, सुनीति कुमार चटर्जी प्रभृति विद्वानांचा हा अभिप्राय दिसतो कीं, गुजराती, मराठी, कानडी व तुंगभद्रेच्या दाक्षिणेकडील भाषांचा अर्वाचीन विस्तार एका द्राविड मूळ रूपा-(Base, substratum)वर झालेला दिसतो; इतकेंच नव्हे तर, वायव्येकडे ब्राहुई व पूर्वेकडे बंगाली या भाषा घेतल्या तर त्यांच्याहि तळाशीं द्राविड पाया दिसतो. याचा अर्थ असा कीं, आर्यांच्या आगमनापूर्वींच्या भारत-वासियांच्या सर्व प्रादेशिक भाषांना आधारभूत असें एक द्राविड मूलरूप होतें व पुढें शतकानुशतकांच्या विकासक्रमांत या प्रादेशिक भाषांवर संस्कृत भाषेचा परिणाम होऊन वेगवेगळ्या देशी किंवा प्राकृत भाषा विस्तारल्या गेल्या. श्री. जोशी यांनीं हा विचार जमेस घेऊन आर्यपूर्व द्राविड भाषाकुलांतील एक भाषा म्हणून हट्टजनांची भाषा गृहीत धरली आहे. नंतर या गृहीत भाषेंतून महाराष्ट्री प्राकृत आणि जुनी कानडी अशा दोन भिन्न भाषा निघाल्या व या दोन भाषांचें विभिन्नत्वच वाढत जाऊन बाराव्या शतकाच्या आधीं मराठी व कानडी या आजच्या दोन भाषा स्थिरावल्या असें त्यांचें मत आहे.

मराठी व कानडी या भाषांचा तुलनात्मक अभ्यास करून श्री. विठ्ठल रामजी शिंदे व श्री. भास्करराव जाधव यांनीं मांडलेल्या पुराव्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून, श्री. जोशी यांनीं असें दाखविलें आहे कीं, या दोन भाषांचा केवळ संपर्क मानल्यामुळें त्यांचा परस्परांशीं असलेला पूर्वापार संबंध कळून येणार नाहीं. तेराव्या शतकांतील ज्ञानेश्वरांपासून सतराव्या शतकांतील मुक्तेश्वरांपर्यंत अविच्छिन्नपणें मराठी कवींना कानडी साहित्याशीं परिचय ठेवावासा वाटे याचीं त्यांनीं उदाहरणें दिलीं आहेत. विशेषतः मुक्तेश्वरांच्या सभापर्वांतील मंगलाचरणाचें कुमारव्यास या कानडी महाकवीच्या उद्योगपर्वांतील मंगलाचरणाशीं साम्य दाखविणारा जो उतारा त्यांनीं दिला आहे तो महत्त्वाचा आहे. सन १५०० च्या आधींच्या कानडी काव्यांतील मंगलाचरणाशीं इतकें विलक्षण तऱ्हेनें जुळणारें मंगलाचरण सन १६५० च्या सुमारास मुक्तेश्वरांनीं लिहिलें याचा अर्थ, आपल्या कवींचा कानडीशीं गाढ परिचय होता. कानडी भाषेच्या आणि साहित्याच्या प्रभावाची ही परंपरा अनेक संशोधकांनीं आजवर मान्य केलेली आहे.

परंतु काव्य आणि साहित्य यांची देवाण-घेवाण ही निर्णायक बाब मानणें प्रस्तुत मुद्द्याच्या दृष्टीनें योग्य होणार नाहीं व म्हणूनच श्री. जोशी यांनीं जास्त निश्चितीचा असा पुरावा मांडला आहे. श्री. शिंदे यांनीं दाखविल्याप्रमाणें नात्याचे ( अप्पा, आबा इत्यादि ) अनेक शब्द व शरीरावयववाचक ( बोट, पोट, टाळू इत्यादि ) अनेक

---

१. 'मऱ्हाटी संस्कृति', पानें ४९, ९२, २०९ व २१४ पहा.








शब्द या दोन्ही भाषांत समान आहेत. शिवाय अनेक संख्यावाचक शब्द मराठींत व कानडींत एकच आढळत आहेत. यापेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे किडणें, मिरविणें, कालविणें वगैरे अनेक कानडी धातू जसेच्या तसे मराठींत आहेत.

सारांश, मराठी व कानडी यांचा नुसता संपर्क नसून त्यांचा कुसवा एकच आहे, असें श्री. जोशी यांचें प्रमेय आहे. त्यांनीं यापुढें जाऊन कानडीची व मराठीची संस्कृत भाषा आत्मसात् करण्याची कमी-जास्त तत्परता व प्रक्रिया यांचेंहि मोठें तपशीलवार वर्णन केलें आहे. या प्रक्रियेंत बौद्ध-जैनांनीं आणि ब्राह्मण पंडितांनीं कशी भिन्न प्रवृत्ति दाखविली आणि या नागर घडामोडींत सामान्य म्हणजे ग्रामीण जनतेनें कसा हातभार लावला त्याची माहिती प्रस्तुत ग्रंथांतूनच जिज्ञासूंनीं वाचावी. ' भाषिक पुरावा ' हें सबंध प्रकरण व उपसंहारांतील २०८ ते २१६ हीं पानें या दृष्टीनें वाचनीय आहेत.

या सर्व विवेचनांत ' महाराष्ट्री 'च्या उद्भवाची व विस्ताराची चिकित्सा मात्र मला पुरेशी वाटली नाहीं.

भाषिक पुराव्याच्या जोडीला राजकीय घटनांचा जो पुरावा श्री. जोशी यांनीं सादर केला आहे तो विचारार्ह आहे. सातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट इत्यादि राजवंशांनीं ज्या प्रदेशांत आपलीं राज्यें स्थापिलीं तो प्रदेश ' महाराष्ट्र ' म्हणावा तर हीं राजघराणीं कानडी होतीं असें दिसतें. परंतु तसें पाहिलें तर या घराण्यांना ' महाराष्ट्रीय '-हि म्हणतां येतें इतकें त्यांचें आजच्या महाराष्ट्राशीं घनिष्ठ नातें दिसतें. त्यांच्या राजधान्या कधीं महाराष्ट्रांत तर कधीं कर्नाटकांत आढळतात आणि याच्याहि बुडाशीं जावें तर भारतीय व परस्थ समकालीनांची स्पष्ट समजूत अशी दिसते कीं, नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंतचा ( आजच्या महाराष्ट्राला व कर्णाटकाला व्यापणारा ) सर्वच प्रदेश एक आहे. त्या सर्व प्रदेशाला मिळूनच कधीं कुंतल हें नांव आढळतें, तर कधीं कर्णाट, तर कधीं महाराष्ट्र ! सारांश, एका सलग प्रदेशांतच या राजवंशांचा उदयास्त, राजधान्यांची अदलाबदल आणि व्यापार, कारागिरी व शिल्प यांची अखंडता दिसून येते.

राजकीय घटनांकडून दैवतें व धर्मपंथ यांच्याकडे वळलें तरी ह्याच एकरूपतेचा प्रत्यय येतो असा निष्कर्ष ग्रंथकर्त्यानें मोठ्या तपशीलानें मांडलेला आहे. विठ्ठल आणि खंडोबा, यल्लमा ( किंवा अंबाबाई ), मरगव्वा ( किंवा मरीआई ) अशीं अनेक दैवतें आहेत कीं जीं कानडी व मराठी लोकांना सारखींच आपलींशीं वाटतात. आणि विशिष्टत्वानें भक्तिविषय झालेलीं हीं सामान्य दैवतें म्हणजे मराठीच्या व कानडीच्या एकरूपतेचीं प्रतीकेंच होत.

दैवतांचा विचार करतांना या विशिष्ट मराठी-कानडी दैवतांची इंद्र, पर्वत, सूर्य, रुद्र, शिव, पार्वती या आर्यांच्या दैवतांशीं ग्रंथकर्त्यानें कधीं सरूपता कल्पिली आहे, तर कधीं वैर कल्पिलें आहे. या बाबतींत त्यांची मांडणी मला घोटाळ्याची वाटते. आर्यांच्या दैवतांचा तसाच आर्येतर ( किंबहुना आर्यपूर्व ) दैवतांचा उगम यज्ञमिथुनाचेंच अमरत्व व दिव्यत्व कल्पिल्यामुळें झाला व यज्ञपुरुष व यज्ञस्त्री यांनाच विश्वाचा जनक व जननी, भव व भवानी किंवा सूर्य व सूर्या अशीं दैवतरूपें लाभलीं असावीं. हा सिद्धान्त जर खरा असेल तर प्राचीन मानवसंस्कृतीमधील सर्वच दैवतांचा विस्तार एकाच दैवतव्यूहापासून मानावा लागेल.[२] मग, आर्य दैवतें आणि द्राविड दैवतें यांचीं यज्ञीय सहोदरत्वामुळें आलेलीं साम्यें सहजच दिसूं लागतील. त्याऐवजीं आज असें मानलें जातें कीं, आर्यांच्या पूर्वभारतीयांशीं झालेल्या विग्रहांत दैवतांचाहि जणूं विग्रह झाला व मग देवाणघेवाण आणि संकर झाला. साऱ्या मानवजातीच्या प्राचीन दैवतांचें किंबहुना भिन्न दैवतव्यूहांचें एकच मूळ आहे व त्यामुळें प्रादेशिक फरकानें तोच तो दैवतव्यूह साऱ्याच प्राचीनांनीं पूजिलेला दिसतो ही गोष्ट श्री. जोशी यांना मान्य नसावी. त्यामुळें शिव, रुद्र, इंद्र, पर्वत, मलय्या, मल्हारी, मार्तंड इत्यादि विविधरूपांचा एकाच

२. रॅग्लन, हॉकार्ट प्रभृति कांहीं मानव-प्रागितिहासशास्त्रज्ञांनीं मांडलेला हा सिद्धान्त आहे.








यज्ञसंभव देवकल्पनेशीं अन्वय न लावतां त्यांनीं आर्य दैवतें व आर्येतर दैवतें यांच्यांत मूलभूत भेद कल्पिला आहे. प्रस्तुत ग्रंथांतील मूळ प्रमेयांवर या कल्पनेमुळें आघात होत नाहीं. परंतु दैवतविचारांत झालेली ओढाताण एकंदरींत वाचकांचें लक्ष विचलित करणारी ठरेल, असें भय वाटतें.

पण दैवतविचारांतून आपण धर्मपंथाकडे आलों म्हणजे मात्र ग्रंथकर्त्यानें सढळपणानें मांडलेली माहिती फार उद्बोधक वाटते. महाराष्ट्रीय संतांच्या वारकरी पंथाबद्दल जो साधारणतः मराठी माणसाचा समज असतो, त्यांत स्वयंभूपणाची भावना दृढ झालेली आहे. 'ज्ञानदेवें रचिला पाया' ह्या उक्तीचा आपण शब्दशः असा अर्थ घेतों कीं, जणूं काय कोठल्याहि पूर्वपरंपरेशिवाय आपोआप मराठी संतांना साक्षात्कार होऊन लाखों लोकांना पंढरीच्या वारीची स्फूर्ति आली. संतवाङ्मयाचे अभ्यासक ज्ञानेश्वरांची पूर्वपीठिका पाहतात व नाथसंप्रदायापर्यंतचा ऋणानुबंध पाहतात हें खरें; परंतु श्री. जोशी यांच्या ग्रंथामुळें या ऋणानुबंधाचें स्वरूप नाथांपुरतें ओळखण्यापेक्षां, त्याकरितां फारच विस्तृत अशीं जुनीं नातीं जुळविण्याची गरज वाटूं लागते. चक्रधरांना 'नग्नदेव' किंवा 'गोमटदेव' म्हणत असत. वीरशैवांचें परमध्येय 'शून्यसाधन' होतें. शून्याची परिभाषा बौद्धांत व नाथांतहि आहे. तशीच परिभाषा लिंगायतपंथीयहि वापरतात आणि या सर्वच मार्गांत गुरुसेवेचें परमतत्त्व सांगितलेलें आहे. या साऱ्या गोष्टींचा संगम होऊन मराठी-कानडी धर्मपंथांच्या मागें एकच परंतु बहुशाखायुक्त अशी साध्य व साधना यांची परंपरा दिसूं लागते. ही गोष्ट मांडतांना श्री. जोशी यांनीं केलेलें सर्वच विवेचन महत्त्वाचें आहे. मराठी व कानडी राजधान्यांतून दहाव्या शतकानंतरच्या काळांत जें विलक्षण विचारमंथन चालूं राहिलें त्यांतून पैठणासारखीं शहरें हीं नव्या धर्मपंथप्रसाराचीं केंद्रें बनलीं. या काळांतील राजवंश ज्याप्रमाणें मराठी-कानडी मुलुखांवर एकदमच नांदत असत त्याप्रमाणें हे धर्मपंथहि या मुलुखांना एकदमच व्यापीत असत. या दृष्टीनें वारकरी, नाथ, वीरशैव, लिंगायत, दत्त व पूर्वींचे दक्षिणभारतीय जैन-बौद्ध या सर्वांचा एका परिसरांत व सूत्रांत विचार केला पाहिजे हें श्री. जोशी यांचें मत विवाद्य होऊं शकत नाहीं. किंबहुना, संतवाङ्मयाच्या अभ्यासकांना तें मार्गदर्शक ठरावें इतकें तें मूलगामी आहे.

मराठी व कानडी संस्कृतींच्या एका मूळरूपाचें प्रमेय मांडल्यावर श्री. जोशी यांच्यापुढें सहजच प्रश्न आला कीं, या मूळरूपाचे कर्ते म्हणून कोणाला मानावयाचें? याकरितां त्यांनीं 'हट्ट'जनांची कल्पना पुढें मांडली आहे. या 'हट्ट' जनांतच विदर्भवासी 'भोजक' जन व आजच्या खानदेशांतील 'कण्ण' जन अशा शाखा त्यांनीं कल्पिल्या आहेत व या दोन शाखांचा विस्तार आजचा महाराष्ट्र व कर्णाटक यांत झाला आहे असें त्यांचें मत आहे. या बाबतींत वऱ्हाडांतील हटगार जात, खानदेशांतील कानडी गवळ्यांची जात व एकंदरच नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत आढळणाऱ्या बंट, नाडव, रट्ठ इत्यादि जाती लक्षांत घेऊन श्री. जोशी यांनीं आपला सिद्धान्त विस्तारला आहे. हा सर्व विषय विवाद्य ठरेल. परंतु ग्रंथकर्त्यानें मांडलेली माहिती महत्त्वाची आहे. एखाद्या नव्या प्रमेयांत गृहीत धरलेलें मूळरूप, उदाहरणार्थ श्री. जोशी यांचें 'हट्ट'जन नुसतें कपोलकल्पित आहे अशी टीका कोणालाहि करतां येईल. पण अशीं मूळरूपें गृहीत धरूनच संशोधनाचें जहाज अज्ञाताच्या सागरांत हांकारावें लागतें. तीच गोष्ट श्री. जोशी यांना करावी लागली आहे. अशा अनेक प्रमेयांचा परिश्रमपूर्वक विस्तार करतांनाच शेवटीं इतिहासवस्तु हातीं लागते. ह्या वृत्तीनें त्यांनीं आपलें विवेचन सादर केलें आहे, म्हणूनच तें अभ्यसनीय आहे.

आतां श्री. जोशी यांच्या दुसऱ्या प्रमेयाकडे वळूं. 'महाराष्ट्र'चें नांव हें संशोधकापुढें मोठें कूटच आहे. व आतांपर्यंत अनेक थोर संशोधकांनीं केलेल्या प्रयत्नांचा परस्परच्छेद व अपयश पाहिलें म्हणजे हा प्रश्न जास्तच गूढ वाटूं लागतो. त्यामुळें संशोधकाला वाटणारें त्याचें आकर्षणहि वाढतें! पण सुरुवातीस हें नमूद केलें पाहिजे कीं, 'महाराष्ट्र'च्या व्युत्पत्तीसाठीं म्हणून श्री. जोशी यांनीं तसा प्रारंभ केलेला नाहीं. 'पट्ट' या








' पडणें ' किंवा ' वसणें ' या अर्थाच्या तामिळ धातूपासून निघालेल्या स्थलनामांचा, ग्रामनामांचा ( व मग पर्यायानें देशनामांचा ) विचार करून त्यांनीं प्रथम पाडा, पट्टि, हाट, हट्टि वगैरे संज्ञांचा अभ्यास केला. त्याच वेळीं ' हाट ' हा देशवाचक शब्द आणि ' वऱ्हाट ' हें विदर्भाचें मूळ नांव याचा अन्वय त्यांना अनुषंगानें लागला. मग कानडींत ' म ' चा ' व ' होतो या नियमावरून ' वऱ्हाट ' चें ' मऱ्हाट ' हें रूप त्यांना लाभलें व ' मऱ्हाट ' हें संस्कृत ' महाराष्ट्र ' चें मूळ नांव आहे असें प्रमेय त्यांनीं मांडलें. म्हणूनच आपणहि स्थलनामांचा विचार मुख्य व ' मऱ्हाट ' चें प्रमेय गौण असा क्रम मानला पाहिजे.

या प्रमेयाच्या सिद्धीसाठीं ' महाराष्ट्र ' च्या व्युत्पत्तीचे पूर्वीचे प्रयत्न त्यांनीं अग्राह्य ठरविले आहेत. ' महाराष्ट्र ' या संज्ञेपेक्षां ' मऱ्हाट ' किंवा ' मरहट्ट ' ह्या संज्ञा ज्ञानेश्वरादिकांच्या काळींहि जास्त रूढ होत्या व हींच मूळ व शुद्ध रूपें मानलीं पाहिजेत असा त्यांचा आग्रह आहे व तो रास्त आहे असें मला वाटतें. रठींच्या पुढाऱ्यांनीं महारठी हें नांव धारण केलें व त्यांच्या भाषेला ' महाराष्ट्री ' व प्रदेशाला ' महाराष्ट्र ' हीं नांवें लाभलीं असा सिद्धांत मांडणारे संशोधक श्री. स. आ. जोगळेकर यांनींहि असें मान्य केलें आहे कीं, " निश्चितपणें शकपूर्वकालांत मांडतां येतील अशा संस्कृत वा प्राकृत ग्रंथांत महाराष्ट्राचा स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं. रामायण व महाभारत या प्राचीन इतिहास-ग्रंथांवरून अनेकांनीं अनेक वेळां हात फिरविला असेल तरी त्यांतहि महाराष्ट्राचें नांव आढळत नाहीं."[३] यानंतर एरणच्या शिलालेखांत ( सन ३६५ ) व ऐहोळीच्या शिलालेखांत ( सन ६३३ ) ' महाराष्ट्रा ' चा उल्लेख प्रथम आढळतो. परंतु, श्री. जोशी यांनीं असा रास्त प्रश्न विचारला आहे कीं, शकपूर्व कालांत नर्मदा-तुंगेच्यामधील प्रदेशांतील जनांना व जनपदांना नांवेंच नव्हतीं काय ? जर तशीं नांवें असलींच पाहिजेत, तर मग याच नांवांच्या मागोव्यानें महाराष्ट्राच्या मूळ नामाकडे जाणें योग्य नाहीं काय ?

जननामांवरून जनपदांचीं नांवें ठरतात हें तत्त्व, मला वाटतें, निरपवादपणें मानूनच आपण पुढें पाऊल टाकावयास हवें. या दृष्टीनेंच, श्री. जोशी यांनीं व इतर अनेकांनीं वेगवेगळे अंदाज केले आहेत. उदाहरणार्थ, रठि जनांवरून महारठींचा ' महाराष्ट्र ' बनला ही श्री. जोगळेकरांची व्युत्पत्ति आहे. मल्ल, मार, महार अशा नांवांवरूनहि इतरांनीं अंदाज बांधले आहेत. अशा या प्रयत्नांपैकीं एक प्रयत्न या दृष्टीनें श्री. जोशी यांची व्युत्पत्ति अभ्यसनीय आहे. ' हट्ट ' या पदाचे दोन अर्थ त्यांनीं घेतले आहेत : ( १ ) ' हट्ट ' म्हणजे ' पट्ट '-धातुसाधित स्थलवाचक शब्द व ( २ ) ' हट्ट ' म्हणजे गोधन व त्यावरूनच ' हट्ट ' ( किंवा हटगार ) हें एका गोपालवृत्तीनें जगणाऱ्या जनांचें नांव. आतां ' महाराष्ट्र ' चें पूर्वरूप ' मऱ्हाट ' याचीं ' मर ' व ' हट्ट ' अशीं दोन पदें समजून ' हट्ट ' पदाचा अर्थ हट्टजनांचा देश असा ते घेतात. म्हणजेच ' हट्ट ' चे वर दिलेले दोन्हीहि अर्थ, मला वाटतें, त्यांना एकदमच घ्यावे लागतात.

' मर ' व ' हट्ट ' या दोन पदांपैकीं पहिल्या पदाचा अर्थ कानडींत 'झाड' असा आहे व म्हणून ' मरहट्ट ' म्हणजे ' झाड-देश ' किंवा ' झाडी-मंडळ ' असा भाषांतरवजा शब्द तयार होतो. नेमका हाच शब्द विदर्भ या मूळ महाराष्ट्राला जुन्या वाङ्मयांत लावलेला आढळतो व हा नुसता योगायोग वाटत नाहीं. आणि योगायोग नसून ' मरहट्ट ' हेंच जर ' झाडी-मंडळा ' चें मूळरूप असल्याचें सिद्ध झालें तर श्री. जोशी यांची व्युत्पत्ति अचूक ठरेल असा संभव दिसतो.

संशोधनामध्यें अशा धाग्यांना धरून कोठवर जावें व कोठें थांबावें हा विचार मोठा बिकट असतो. परंतु श्री. जोशी यांची व्युत्पत्ति केवळ ' झाडी-मंडळा ' च्या धाग्यावर आधारलेली नाहीं, हें ग्रंथाचें पहिलें व दुसरें हीं प्रकरणें समग्र वाचल्यानें कळून येईल.

झ

३. ' महाराष्ट्र-परिचय ' या आगामी संग्रहग्रंथाची प्रस्तावना, पान १६ पाहा.










या बाबतींत मला एक आक्षेप घ्यावासा वाटतो. तो असा : जनांचें नांव व त्यावरून जनपदांचें नांव हा नियम पक्का धरून ठेवला तर ' मर–हट्ट ' यांत हट्ट हें पद ( किंवा ' मर ' हें पद ) जननामच हवें. त्या पदाचा अर्थ जनवाचक आणि देशवाचक असा एकदमच दुहेरी घेण्याची ही आपत्ति कशी टाळावयाची ? ' हट्ट ' हें जननामच धरलें, तर आणखी एक प्रश्न उद्‌भवतो. जननामें कशीं पडतात हा तो प्रश्न. गोपालन करणारे, शेती करणारे, व्यापार करणारे किंवा आयुधजीवी व पौरोहित्यजीवी लोकसमूह असतात. पण त्यांच्या धनगर, वाणी, रजपूत किंवा ब्राह्मण अशा जाती मानावयाच्या का त्यांना ' जन ' मानावयाचें ? वृत्तीवरून जातिवाचक नांवें पडतातच. पण तीं जननामें कशीं ठरतील ? मला वाटतें कीं, वृत्तीवरून किंवा सामाजिक अवस्थेच्या स्वरूपावरून जननामें पडत नाहींत.[४] याचाच उलट पर्याय असा कीं, जीं जननामें वृत्तीचा बोध करून देतात तीं खरीं जननामें नसून जातिवाचक संज्ञाच होत. आजचे गुरव, ब्राह्मण, धनगर, इत्यादि लोकसमूह ' जन ' नव्हेत. तर मग पूर्वीच्या काळांतहि अशा लोकसमूहांची ' जनां'शीं गल्लत करणें चूक ठरेल.

ही कसोटी बरोबर असेल तर ' हट्ट ' जनांबद्दल विकल्प मनांत येतो. हें केवळ वृत्तिवाचक नांव आहे का ? तें तसें आहे अशी श्री. जोशी यांचीहि कल्पना दिसते. मग त्यांना विशिष्ट ' जन ' म्हणणें योग्य होणार नाहीं. हाच आक्षेप इतर संशोधकांच्या प्रमेयांबद्दलहि घेतां येईल. उदाहरणार्थ, ' महार ' ही आपल्या गांवगाड्यांतील एक वृत्ति किंवा वतन आहे व म्हणून ' महारां'ना जन म्हणतां येत नाहीं. ' नाग ' जनांचे वंशज म्हणजे ' महार ' असें मानणें हें मग व्यर्थच ठरतें. तीच गोष्ट रठ, रिस्टिक ( किंवा राष्ट्रिक ), भोज व पेत्तनिक यांच्याबद्दल म्हणावी लागेल. शेवटच्या तीन शब्दांच्या अर्थांबद्दल हा उतारा पाहा :

" अंगुत्तरनिकाय ( ३. पान ४५६ ) व त्यावरील टीका यांतील उल्लेखांच्या अनुरोधानें डॉ. देवदत्त भांडारकरांनीं अनुमानिलें कीं, पेतेनिक म्हणजे वंशपरंपरागत. ' पितरा दत्तम् सापतेय्यम् भुञ्जतीति पेत्तनिको '–पूर्वार्जिताचा उपभोग घेतो तो पेत्तनिक, अर्थात् रिस्टिक–पेतेणिक म्हणजे कुलक्रमागत राष्ट्रिक आणि भोज. पेतेणिक म्हणजे कुलक्रमागत स्थानिक राज्यकर्ता." [५] यावरून असें स्पष्ट दिसतें कीं अशोककालीन रज्जुक, तसेंच रिस्टिक, राष्ट्रिक, रठि किंवा भोज हीं सारीं नंतरच्या काळांतील देशमुख, देशपांडे, पाटील व बलुतेदार यांच्याप्रमाणेंच वृत्तिवाचक व कांहीं अधिकारवाचक नांवें आहेत. तीच गोष्ट राष्ट्रकूट या संज्ञेबद्दलहि म्हणतां येते. अनेक दानपत्रांतून त्या त्या प्रदेशांतील राष्ट्रकूट ( देशमुख ), ग्रामकूट ( पाटील ) आणि प्रमुख कुटुंबी ( गांवाचे पंच ) यांचा निर्देश असतो. नंतरच्या काळांत देशमुखांना नांगराचें चित्र असलेल्या मुद्रेचा हक्क होता आणि कांहीं शिलालेखांवर आरंभींच नांगराचें चित्र आढळतें. यावरून राष्ट्रकूट हें कोणच्याहि प्रदेशांतील मूळच्या जनांचें नांव न ठरतां ते देशमुख वतनदार होते हेंच जास्त स्पष्ट होतें. पण श्री. जोशी यांनीं याच नांगराच्या चिन्हावरून राष्ट्रकूटांना मूळ ' जन ' मानलें आहे. त्यांनीं मांडलेलें राष्ट्रकूट=राष्ट्रिक=नाडव हें समीकरण मानूनहि राष्ट्रकूटांना ( किंवा नाडवांना ) ' जन ' मानतां येईल असें नाहीं. राष्ट्रकूट राजवंश हा एका पराक्रमी देशमुख व्यक्तीचा राजवंश ठरतो; पूर्वी गुलाम असलेल्या सबक्तगिनाला पराक्रमानें राज्यपद मिळाल्यावर त्याचा ' गुलाम ' नांवाचा राजवंश ठरतो त्यांतलाच हा प्रकार होय. परंतु यावरून राष्ट्रकूटांना ' जन ' कसें मानतां येईल ?

जननामांच्या बाबतींत हा आग्रह नमूद करतांना मला अर्थातच ही जाणीव आहे कीं, भोज, राष्ट्रिकप्रभृति संज्ञा जनवाचकच आहेत असेंच

---

४. देशनामें भौगोलिक वैशिष्ट्यावरून पडत नाहींत व म्हणून ' अश्मक ' हें दगडांमुळें लाभलें असे तर्क दुबळे मानावे लागतात. नांवें हीं वर्णनात्मक नसतात. हाच नियम जननामें व देशनामें यांना लागतो हाच याचा अर्थ.

५. श्री. स. आ. जोगळेकर, किंत्ता, पान १० पहा.










बहुतेक संशोधकांचें मत आहे. उदाहरणार्थ, भोजांना जन समजून त्यांचा विस्तृत इतिहास डॉ. बी. सी. लॉ यांनीं ' ट्राइब्स इन् एन्शंट इंडिया ' ( पा. ३६६–३७३ ) या आपल्या प्रसिद्ध ग्रंथांत दिला आहे. परंतु हट्ट, पत्ति, इत्यादि जननामांचा विचार श्री. जोशी यांनीं मांडला आहे, त्या अनुषंगानें वरील विकल्प मी मांडला आहे एवढेंच. , जनां 'चीं नांवें हीं गोपालनादि उपजीविका-वृत्तींवरून किंवा राष्ट्रिकादि अधिकार वृत्तींवरून पडलेलीं असणें असंभवनीय आहे. मग जननामांचें मूळ स्वरूप तरी काय असावें ? याचें उत्तर असें देतां येईल कीं, एकाद्या जनाचें विशिष्ट देवक ( totem ) हें त्या जनाचें नांवहि असतें. उदाहरणार्थ ' नाग ', ' वृक्ष ', ' सूर्य ' हीं देवकें व म्हणूनच निशाणावरील चिन्हें असणाऱ्या जनांना ' नाग 'जन, ' वृक्ष 'जन किंवा ' सूर्य '-जन अशीं नांवें असतात. जपानी लोक स्वतःला ' सूर्य 'जन मानतात. अशीं अनेक उदाहरणें देतां येतील.

अशा तऱ्हेचीं खरीखुरीं देवकनामें धारण करणारे जन व त्यांचीं जनपदें प्रथम ठरवितां आलीं तरच मग अशा जनपदांचा संकोच-विस्ताराचा क्रम शोधून महाराष्ट्र व कर्णाटक यांचा पूर्वेतिहास ठरवितां येईल. त्या दिशेनें जाण्याचा मार्ग जननामावरून ' मऱ्हाट ' हें देशनाम साधण्याच्या परिश्रमपूर्वक प्रयत्नामुळें श्री. जोशी यांनीं मोकळा करून दिला आहे. आणि ' हट्ट ', ' कण्ण '-प्रभृति जनांच्या अस्तित्वाचें प्रमेय अभ्यासकांपुढें मांडलें आहे, हेंच महत्त्वाचें आहे.

आतां श्री. जोशी यांच्या ग्रंथांतील तिसऱ्या प्रमेयाचा थोडक्यांत परिचय देऊन मी ही ग्रंथाची ओळख पुरी करतों. पहिल्या दोन प्रमेयांच्या बाबतींतहि मीं आधींच एक गोष्ट सांगावयास पाहिजे होती कीं, गेलीं वीस वर्षें याच विषयाचा व्यासंग करून ग्रंथकर्त्यानें मांडलेल्या प्रमेयाची ग्राह्याग्राह्यता पारखणेंच काय, परंतु परिचय करून देण्याइतकाहि माझा अभ्यास नाहीं. तरी पण एक जिज्ञासु म्हणून येथवर मीं आपले विचार मांडले. परंतु तिसऱ्या प्रमेयाच्या बाबतींत तर माझा मुळींच अधिकार नाहीं. तेव्हां त्या प्रमेयाची थोडी आणि जुजबी ओळख करून देणें हेंच काम राहतें.

कानडी-मराठीच्या मूळरूपाचा शोध घेत ' हट्ट ' जनांपर्यंत पोंचल्यावर, तेथूनहि मागें दूरवर जाण्याचा मार्ग संशोधकाला एक प्रकारें आमंत्रणच देत असतो. असा प्रकार श्री. जोशी यांचा झाला आहे. व तोच प्रकार एकंदर भारतीय प्रागितिहासाच्या बाबतींत नेहमींच झालेला आढळतो. भारताच्या प्रागितिहासाचें लोण आर्यांच्या आगमन-काळापर्यन्त नेऊनच पूर्वींच्या संशोधकांना सिंधु-संस्कृतीच्या अज्ञात सीमेपर्यंत जाणें भाग पडतें. या बाबतींत श्री. जोशी यांनीं प्रथम असें म्हटलें आहे कीं, आर्यपूर्व भारतीयांच्या संस्कृतींपैकीं एक अवयवच असलेल्या तमिळ ( किंवा संस्कृतांत ' द्राविड ' ) संस्कृतीच्या मापानें मोजणें योग्य होणार नाहीं. या आर्यपूर्व संस्कृतीला ' पत्ति ' जनांची संस्कृति या व्यापक नांवानें ओळखावें. हे पत्तिजन म्हणजे वेदकालीन आर्यांना ठाऊक असलेले रुद्रपूजक जन होत. या जनांच्या भाषेंतील श्वेंद्र, लिंग, वगैरे शब्द संस्कृतांत शिरले आहेत व ' पट्ट ' धातुसाधित स्थलवाचक संज्ञाहि पत्तिजनभाषेंतूनच आर्यांनीं घेतल्या आहेत. श्वेंद्र, लिंग व पट्टि-हट्टि या शब्दांपुरती त्यांची भूमिका बरोबर ठरेल असा अभिप्राय मला एका संस्कृतज्ञानें दिला. परंतु हा कांहीं शब्दांच्या देवाणघेवाणीपुरता प्रश्न नसून फारच व्यापक अशा दोन संस्कृतींच्या संगमाचा व संघर्षाचा हा प्रश्न आहे.

या बाबतींत श्री. जोशी यांच्या एकंदर भूमिकेचें वैशिष्ट्य असें कीं, भारताच्या प्रागितिहासाचा विचार करतांना आर्यपूर्व भारतीयांना वन्य असंस्कृत अवस्थेंतून ' माणसां 'त आणण्याचें कार्य आर्यांनीं केलें ह्या परंपरागत दृष्टीचा त्यांनीं त्याग केला आहे. आर्यांनीं मूळच्या अनार्य बर्बरांचा उद्धार केला असें मानून सर्व प्रागितिहास रचण्याचें तत्त्व पाश्चात्त्य, विशेषतः जर्मन, विद्वानांनीं आपल्याकडील पहिल्या पिढीच्या विद्वानांना शिकविलें, जातिसंस्थेची विषमता ऐतिहासिक व वांशिक घटनांमुळें उत्पन्न होणें कसें अपरिहार्य ( व रास्तहि ) होतें हें सिद्ध

करण्यासाठीं आर्यांच्या उद्धारकार्याचें हें तत्त्व उच्चवर्णीय विद्वानांना ग्राह्य वाटलें. परंतु, अली-कडच्या संशोधनांमुळें या तत्त्वाची पकड ढिली होत गेलेली आहे व कांहीं वेळां तर नेमकी उलट भूमिका घेण्याचा एकांतिक विचारहि डोकावूं लागला आहे. श्री. जोशी ह्यांनीं ही प्रतिक्रियात्मक एकांतिक भूमिका स्वीकारलेली नाहीं, परंतु आर्यांच्या उद्धारकार्याचें तत्त्वहि मानलेलें नाहीं. किंबहुना त्यांच्या प्रस्तुत ग्रंथामुळें त्या तत्त्वावर अप्रत्यक्षपणें पुष्कळ आघात झाले आहेत व आर्य-पूर्व भारतीयांच्या संस्कृतीकडे, भाषेकडे, जनांकडे व दैवतांकडे आत्मीयतेनें व आदरानें वळण्याची गरज त्यांच्या विवेचनामुळें स्पष्ट होणार आहे. मराठी, कानडी इत्यादि लोकभाषांचा व त्यांच्या पूर्वरूपांचा शोध घेणें, तसेंच लोकांच्या दैवतांचा, सणांचा व क्षुल्लक भासणाऱ्या पंथांचा अभ्यास करणें संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासापेक्षांहि आतां जास्त निकडीचें आहे, ही गोष्ट श्री. जोशी यांच्या ग्रंथामुळें आपल्या अभ्यासकांच्या समोर ठळकपणें आली आहे. आर्यप्रधान संशोधनांच्या चाकोरींतून बाहेर पडण्यास या ग्रंथामुळें मदत होणार आहे, व ग्रंथकर्त्यांचे निष्कर्ष सदोष ठरले तरी ही नवी दिशा स्पष्ट केल्याचें श्रेय त्याला निश्चितच द्यावें लागेल.

आर्य द्रविड प्रश्नासंबंधींच्या श्री. जोशी यांच्या प्रमेयाचा जास्त परिचय करून घेण्यासाठीं जिज्ञासूंनीं व तज्ज्ञांनीं मूळ ग्रंथांतून या व्यापक प्रमेयाची समग्र मांडणी पाहावी अशी मी विनंति करतों.

शेवटीं मी एवढेंच म्हणेन कीं, या ग्रंथामुळें 'मऱ्हाटी' बद्दल जिज्ञासा वाढली व मराठी-कानडीचा मूळस्वरूपाचा शोध नेटानें सुरू झाला, तरी ग्रंथाचें चीज झाल्याचें समाधान लेखकाला लाभेल. भाषिक प्रांतरचनेंतील वैमनस्यें हीं केवळ अशा प्रबंधाचा उतारा देऊन नाहींशीं होणारीं नाहींतच. परंतु या वैमनस्यांच्या आहारीं व स्वार्थप्रेरित राजकीय अपप्रचाराच्या कह्यांत सामान्य लोकांनीं जाऊं नये यासाठीं अशा ज्ञानाचा उपयोग खास होईल. मानवजातीवर अधिराज्य करण्याची पात्रता नॉर्डिक (आर्य) वंशाला आहे असा हिट्लरच्या दरबारी पंडितांनीं प्रचार केला! भारतीयांनीं सर्व ग्रीकांची उसनवारी केली असा प्रचार कांहीं इंग्रज पंडितां-नीं केला. विद्वत्तेला राबवून हीन प्रचार झाल्याचीं अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. अशा भ्रष्ट पांडित्याचा समाचार घेण्यासाठीं सत्यान्वेषी व लोकहितदक्ष पांडित्यानेंच पुढें आलें पाहिजे. संशोधनाच्या मार्गे अशी लोकहिताची एषणा व दक्षता असणें हेंच मुळांत गैर आहे असें मानणारे टीकाकार म्हणतील कीं, श्री. जोशी यांनीं हवीं तर आणखी प्रमेयें मांडावीं पण मराठी-कानडी भाषिकांच्या सलोख्याची तळमळ मनांत ठेवूं नये. दुर्दैव हें कीं विद्वत्तेच्या 'चवरीला केरसुणीची' उपयुक्तता आणण्याचा खटाटोप श्री. जोशी यांनीं केला आहे, असें श्री. टिकेकर यांच्यासारख्या मार्मिक समीक्षकानें म्हटलें आहे. परंतु मला वाटतें कीं, श्री. जोशी यांच्याप्रमाणें सर्वच पंडितांनीं संशोधनामध्यें ज्ञानसाधनेबरोबरच लोकशिक्षणाची आस्था मनांत बाळगली, तर तें ज्ञानाला बाधक न ठरतां पोषकच ठरेल.

आज आंध्र, महाराष्ट्र, कर्नाटक इत्यादि भाषिक प्रदेश आपापल्या देशनामांचा इतिहासच नव्हे तर आपापलें भविष्यच शोधीत आहेत व या प्रयत्नांत भारताच्या नव्या उज्ज्वल भविष्याचेंहि स्वप्न मूर्त करूं पाहात आहेत. अशा वेळीं श्री. जोशी यांच्या दीर्घ व्यासंगाचीं अशी फळें मराठी व कानडी लोकांना लाभत जावींत अशी आशा प्रकट करून ह्या परिचयाचा मी समारोप करतों.

---

## 'मऱ्हाटी संस्कृति'

या पुस्तकावर आ. विनोबा यांचा अभिप्राय 'सेवक' (१-५-५३) मध्यें आलेला आहे. त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

"कर्नाटक आणि महाराष्ट्र यांचा जिव्हाळ्याचा संबंध प्राचीन काळापासून आहे ही गोष्ट सर्वमान्यच आहे. या पुस्तकानें ती दृढ केली आहे. ...लेखकानें परिश्रम अपारच केला आहे.








लेखकाचीं अनेक प्रमेयें कुणास मान्य होवोत वा न होवोत, त्याचा परिश्रम सर्वांसच मान्य करावा लागेल.

" ' हें आम्हांसि कानडें ' असें म्हणण्यांत ज्ञानेश्वरांचा मराठीचा अभिमान व्यक्त होतो असें लेखकाचें एक कथन आहे. ज्ञानदेवांना अवगत नसलेला अर्थ त्यांच्या वाक्यांत लेखकाला सांपडला आहे. संस्कृताहून वेगळेपणानें मराठीचा अभिमान ज्ञानदेवांनीं धरिला होता आणि तोहि एवढ्या-साठीं कीं मराठी ही प्राकृत जनांची भाषा होती. मराठीप्रमाणें कन्नडसुद्धां प्राकृत जनांची भाषा असल्यामुळें ज्ञानदेवांच्या करुणामय हृदयांत कन्नडलाहि तितकाच अवकाश होता. कानडी शब्द ज्ञानदेवांनीं मोकळे-पणानें आपल्या लेखनांत वापरले आहेत, हें तर लेखकानेंच नमूद केलें आहे. शिवाय ' विठ्ठल कानडा कर्नाटकु तेणें मज लावियलें वेधीं' या पद्यांत कानडा आणि कर्नाटक हीं दोन विशेषणें विठ्ठलाला श्लेषानें लाविलीं आहेत. जगाचें विशाल नाटक रचणारा कौतुकी म्हणून ' कर्नाटकु ' आणि वेदा-दिकांनाहि त्याचें रहस्य आकळतां आलें नाहीं म्हणून तो ' कानडा. ' कानडा म्हणजे कठिण, रहस्यभूत. हा अर्थ न्यूनतासूचक नसून आदरसूचक आहे, हें रामदासांच्या खालील वचनावरून लक्षांत येईल :

' गुप्त तेंचि अभ्यासावें । असाध्य तेंचि साधावें ।
कानडेंचि अभ्यासावें । सावकाश ॥ '

" पुस्तकांत मुक्तेश्वराच्या ' सभापर्वा 'तील एक उतारा देऊन त्याच्या जोडीला कुमारव्यासाच्या कानडी भारतांतील एक उतारा सादर केला आहे आणि त्यावर ' हें साम्य अभ्यसनीय आहे ' एवढाच शेरा लेखकानें दिला आहे. कुमारव्यास आणि मुक्तेश्वर दोघेहि आपापल्या भाषेचे महाकवि आहेत. कुमारव्यास निःसंशय दीडशें वर्षें तरी मुक्तेश्वराच्या आधींचे आहेत. मुक्तेश्वर कर्नाटकचा राहणारा असून त्याला कन्नड भाषा येत होती याबद्दल शंकाच नाहीं. लेखकानें सादर केलेले दोन उतारे इतके तंतोतंत आहेत कीं, त्यांतील ' साम्य अभ्यसनीय आहे ' हें अगदींच कमी बोलणें होईल. दोन्ही उताऱ्यांना तिसरेंच एखादें संस्कृतांत मूळ असेल तर गोष्ट वेगळी. एरवीं मुक्तेश्वरांनीं कुमार-व्यासाचें भाषांतरच केलें आहे, असें म्हणावयास पाहिजे. कुमारव्यास आणि मुक्तेश्वर यांच्या ग्रंथांचें समग्र अध्ययन करून कुणीं यावर अधिक प्रकाश पाडील तर बरें होईल....हें पहिलें आंतरभारती-प्रकाशन शोभिवंत आणि विद्वत्-सेव्य आहे. "

---

## अभंगयुग्मक

— १ —

तत्त्वसमन्वयीं जीवन स्थिरावें
तसेंच साधावें । जीवन हें
म्हणूनिया सखे, प्रतीक्षा मी करीं,
जीवनाभीतरीं । केंव्हां येशी ?
पहा दिनकर रंगीत करांनीं
बागेस वेढुनी । जागा करी
तथा बागेमधें मंडप पसरी
प्रीतीच्या झालरी । जुईसवें
फुलपांखरांची जोडी तयावरी
संगेंच गहिरी । तरंगते
मी मात्र खालतीं तिष्ठत राहतों
अधीरा पाहतों । वाट तुझी

— २ —

तुझीया प्रीतीनें दृष्टि नवी लाधे,
उल्हासलें मोदें । मम मन
प्रीतीच्या लोचनी पाहतां समोर
उत्तुंग शिखर । दृष्टीपुढें
गरुडाची झेंप घेऊं बघे मन,
कराया उड्डाण । स्फुरण ये
अनेक आकांक्षा, अनेक आदर्श
इन्द्रधनुष्यास । लाजवीती
तयांशी गाठाया जीव उचंबळे
प्राण तळमळे । उतावळा
तुझीया प्रेमाचा संजीवनीमंत्र
चेतवी पवित्र । चेतनेला

—ना. ग. जोशी








पं. सातवळेकर यांच्या कांहीं विधानांचा परामर्श : श्री. स. वि. बर्वे

# पौराणिक हरिश्चन्द्र व वैदिक हरिश्चन्द्र

**पं. सातवळेकर** यांच्या **'भारतीय संस्कृति'** या प्रदीर्घ निबंधांत बुद्धोत्तरकालीन भारतीय संस्कृति सत्य व अहिंसा यांच्या स्तोमानें कशी नादान झाली व बुद्धपूर्वकालीन शुद्ध वैदिक संस्कृति अर्थात् किती थोर होती या आपल्या निबंधाच्या मध्यवर्ती कल्पनेच्या स्पष्टीकरणार्थ, सत्यव्रताकरितां जगद्वंद्य ठरलेल्या राजा हरिश्चंद्राचें कथानक ऊहापोहाकरितां घेऊन, प्रसिद्ध पौराणिक हरिश्चंद्र हा राजा म्हणूनच नव्हे, तर साधा गृहस्थ म्हणूनहि किती नालायक होता हे दाखवून त्याच्या तुलनेनें वैदिक हरिश्चंद्र किती आदर्शभूत होता हें दाखविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे.

या प्रयत्नांत हरिश्चंद्र, हरिश्चंद्राचें कथानक लिहिणारा पुराणलेखक, हरिश्चंद्राला पूज्य मानणारे आम्ही आजकालचे भारतीय यांची त्यांनीं जी मनसोक्त निंदा करून घेतलेली आहे ती इतकी उद्वेगजनक आहे कीं, सत्यव्रत हरिश्चंद्राच्या वतीनें चार शब्द तरी लिहिणें आपलें कर्तव्य समजून प्रस्तुतचा निबंध लिहिण्याचें ठरविलें आहे.

पं. सातवळेकर यांचे राजा हरिश्चंद्राच्या वर्तनावरील आक्षेप किती निराधार आहेत हें दाखविण्यापूर्वी हरिश्चंद्रासंबंधीं त्यांचें म्हणणें काय आहे हें त्यांच्या ' भारतीय संस्कृतीं 'तील पुढील कांहीं उताऱ्यांवरून दिसून येईल :

' सर्वांचें या कथेवर अत्यंत प्रेम आहे. हें असलें आंधळें व विचारशून्य प्रेम करण्यांत हिंदु जाति सध्यां अत्यन्त प्रवीण झालेली दिसत आहे. ' ( पान ३२ ). ' असा हा राजा खरोखर राजा होण्यास अथवा साधा गृहस्थ नागरिक होण्यास तरी योग्य आहे कीं काय हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. ' ( पा. ३३ ). 'वैदिक ऋषींना राज्याचें महत्त्व कळलें नव्हतें कीं ही कथा रचणाराला तें कळलें नव्हतें' ( पा. ३३ ). ' यावरून ही कथा कोणी तरी अडाणी भगतानें लिहिलेली असावी असें दिसतें. ' ( पा. ३३ ). ' याचसाठीं हिंदूंना निरनिराळ्या प्रकारच्या डोंबांच्या घरीं वारंवार गुलाम बनून विकत जाण्याची पाळी येत असते. ' ( पा. ३३ ).

हरिश्चंद्राची कथा सर्वश्रुत असल्यानें तिची महती वर्णन करीत न बसतां पं. सातवळेकर यांच्या मुख्य आक्षेपांकडे वळतों. त्यांचा आक्षेप असा कीं, ' आपल्या वेदशास्त्राप्रमाणें अथवा नीतिशास्त्राप्रमाणें राज्य ही दान करण्याची वस्तु आहे असें सिद्ध होऊं शकेल काय ? '. असा प्रश्न करून ते पुढें लिहितात : ' राजा हा प्रजेकडून निवडून बनविला जात असे. राजा स्वयंभू नसे. असा प्रजेचें दान करण्याचा अधिकार कोणास बरें असेल ? '. यावरून ते असें अनुमान काढतात कीं, ' ही कथा कोणी तरी अडाणी भोळ्या भगतानें लिहिलेली असावी. '

आतां या पंडितजींच्या विधानावर आम्हांस त्यांना असें विचारावयाचें आहे कीं, राज्याचें दान करणारा खुळा राजा हरिश्चंद्र हा एकटाच होऊन गेला काय ? ' पुण्यश्लोकनृपावळींत पहिला होवोनि जो राहिला ' असें ज्याच्याबद्दल आपण अभिमानानें म्हणतों, एवढेंच नव्हे तर खुद्द पं. सातवळेकरहि ज्याची आदर्श राजा म्हणून तोंडभर स्तुति करतात ( 'पुरुषार्थबोधिनी गीता', पान २७० पाहा ) त्या नळ राजानें आपलें राज्य दान केलें नव्हतें का ? तुलनाच करावयाची तर नळराजानें आपलें राज्य जुगारांत घालविलें त्यापेक्षां हरिश्चंद्रानें सत्यवचनपालनाकरितां तें देऊन टाकिलें ही गोष्ट किती तरी उच्च कोटींतील आहे ! असें असतां पंडितजींना नळराजा हा आदर्श वाटतो व हरिश्चंद्र मूर्ख वाटतो. नळराजाला आपल्या राज्याचें दान करण्याचा अधिकार कोणत्या नीतिशास्त्रानें दिला होता ? कीं नळराजाची कथासुद्धां एखाद्या ' मूर्ख पुराणिका'नें रचलेली आहे ? एवढेंच नव्हे तर ज्या युधिष्ठिर राजाला त्याच्या धर्माचरणावरून धर्मराज असें सार्थ नांव पडलें, त्या धर्मराजानें नाहीं का जुगारांतच आपल्या राज्याचें दान करून टाकलें ? या व अशा प्राचीन राजांच्या कथांवरून हें सिद्ध होतें कीं, प्राचीन काळचे, म्हणजे

# पौराणिक हरिश्चन्द्र व वैदिक हरिश्चन्द्र

पंडित सातवळेकरांच्या पवित्र व आदर्श अशा बुद्ध-पूर्व काळांतील भारतीय राजे, आपल्या राज्यांचें दान करीत होते. म्हणून हरिश्चंद्राची कथा ही केवळ याच मुद्द्यावर भाकडकथा ठरवावयाची असेल, तर इतर पुष्कळच कथा तशाच ठरवाव्या लागतील.

आतां राजा ही संस्थाच मुळीं प्रजेनें निर्माण केलेली असल्यानें राज्य म्हणजेच प्रजा दुसऱ्याला देऊन टाकण्याचा अधिकारच राजाला नाहीं असें जें पंडितजींचें म्हणणें, त्यावर असें सांगतां येईल कीं, अगदीं आरंभीं राजा हा जरी प्रजानिर्मित असला असें मान्य केलें तरी पुढें प्रत्यक्षांत प्रजेचे अधिकार नाहींसे होऊन राज्याचें बरेंवाईट करण्याचे सर्व अधिकार राजाकडेच आलेले होते व म्हणूनच तो स्वतःच्या खासगी मिळकतीप्रमाणें राज्यें देऊं व घेऊं शकत असे. शिवाजीमहाराजांनीं आपल्या राज्याची दान-चिठ्ठी स्वामी रामदासांच्या झोळींत टाकिली तेव्हां त्यांनीं प्रजाजनांचा कौल घेतला होता काय? इ. स. १६६१ सालीं पोर्तुगालच्या राजानें इंग्लंडचा राजा दुसरा चार्ल्स् यास आपली मुलगी दिली त्या वेळीं मुंबई बेट आंदण दिलें असें आपण इतिहासांत वाचतों. हें बेट आंदण देतांना पोर्तुगालच्या राजानें मुंबई बेटांतील प्रजेची संमति घेतली होती काय?

यावर पं. सातवळेकर कदाचित् असें विचार-तील कीं, राज्य दान करण्याचा अधिकार राजाला आहे असें जरी मान्य केलें, तरी तें वाटेल त्या माणसाला दान करणें हा शहाणपणा ठरेल काय? यावर आमचें असें उत्तर आहे कीं, हरिश्चंद्रानें वाटेल त्या वाटच्या वाटसरूला हें राज्याचें दान केलें नव्हतें. अत्यंत लायक अशा एका ऋषीची ती मागणी आहे हें विसरतां कामा नये. विश्वामित्र हा अत्यंत थोर लायकीचा ऋषि होता ह्या-बद्दल खुद्द पं. सातवळेकरांचेंच शिफारसपत्र येथें सादर केलें म्हणजे पुरें. ते म्हणतात : 'विश्वामित्र हा वैदिक ऋषि आहे व तो मंत्रद्रष्टाहि आहे. याचा गायत्री मंत्र सर्व द्विज प्रत्यहीं जपत असतात.' (भा. सं., पा. ३३). दुसरें असें कीं विश्वामित्र व हरिश्चंद्र यांचा संबंध फार घनिष्ठ आहे. हरिश्चंद्राचा पिता त्रिशंकु याला इतर सर्व ऋषींनीं नकार दिला असतां आपली सर्व तपश्चर्या पणास लावून ज्यानें त्याला सदेह स्वर्गास नेण्याकरितां जिवापाड धडपड केली तो विश्वामित्रच होय. अशा रीतीनें ज्यानें आपल्या पित्याकरितां आपली तपश्चर्या पणास लाविली व जो पूर्वाश्रमींचा क्षत्रिय राजा असल्यानें राज्य चालविण्यासहि पूर्ण लायक होता व ज्याच्या मंत्रद्रष्टेपणाबद्दल पं. सातवळे-करहि शिफारसपत्र देतात त्या विश्वामित्रानें मागणी केल्यावर हरिश्चंद्रानें ती कृतज्ञतापूर्वक मान्य केली तर तो चुकला कोठें?

आतां पं. सातवळेकरांचा फक्त एकच आक्षेप राहिला व तो म्हणजे हें दान स्वप्नांत दिलेलें होतें, तें पाळण्याची जबाबदारी त्याच्यावर नसतांना त्यानें विनाकारण आपले हाल करून घेतले. 'सत्य बोलण्याच्या स्वतःच्या अहंकारासाठीं' (भा. सं., पा. ३३) हरिश्चंद्रानें हें केलें असें त्यांचें म्हणणें. हरिश्चंद्राच्या सत्यव्रताला अहंकार म्हणणें याहून एखाद्याच्या वर्तनाचा अधिक विपर्यास होऊं शकेल असें वाटत नाहीं. परंतु तो विपर्यास पं. सातवळेकरांसारख्या वैदिक संस्कृतीच्या अभिमान्यानें करावा याबद्दल फार वाईट वाटतें.

आतां हरिश्चंद्राला पडलेलें स्वप्न केवळ 'आभासात्मक' होतें कीं काय हें पाहावयाचें. सर्वच स्वप्नें केवळ आभासात्मक नसतात हें पं. सातवळेकरांस कोणी सांगावयास पाहिजे असें नाहीं. आम्ही एवढेंच सांगूं इच्छितों कीं हरि-श्चंद्राला पडलेलें स्वप्न मात्र निश्चितपणें आभासात्मक नव्हतें. कारण तसें तें असतें तर खरोखरीचा विश्वामित्र दुसरे दिवशीं त्याच्यापाशीं राज्याचें दान मागण्याकरितां आलाच नसता. विश्वा-मित्रानें हरिश्चंद्राकडे जाऊन राज्य मागावयाचें हें ठाम ठरविल्यामुळें त्याची सूचना हरिश्चंद्रास स्वप्नरूपानें मिळाली एवढेंच. अशा प्रकारें एका माणसाच्या निश्चयाची सूचना दुसऱ्या माणसाला मिळूं शकते याचे दाखले स्वप्नविषयक कोणत्याहि शास्त्रीय ग्रंथांत पाहावयास मिळतात. आनंदघनराम यांच्या 'स्वप्नमीमांसा' या पुस्तकांतील 'पर-प्रेरित स्वप्नांची कारणमीमांसा' हें तेरावें प्रकरण,








तसेंच 'प्रत्यक्ष सूचक स्वप्नें' हें सतरावें प्रकरण व 'परप्रेरित स्वप्नें' हें बारावें प्रकरण—यांवरून वरील विधानाची साधारण कल्पना येईल.

येथवर पौराणिक म्हणूनच सातवळेकरांचा नावडता हरिश्चंद्र 'साधा गृहस्थहि होण्यास योग्य नव्हता' या पंडितांच्या विधानाचा व त्यांच्या सर्व आक्षेपांचा परामर्श घेतला. आतां त्यांच्या लाडक्या म्हणजे वैदिक हरिश्चंद्राकडे वळूं.

पंडित सातवळेकरांनीं पौराणिक हरिश्चंद्राला नालायक ठरवून आदर्शभूत असा वैदिक हरिश्चंद्र आपणापुढें मांडिला आहे. 'वर आपण पुराण-काळ बुद्धाच्यानंतरच्या काळांतील भोळ्या व राष्ट्रहिताची कल्पनाहि नसलेल्या लेखकांनीं कल्पिलेला हरिश्चंद्र पाहिला. आतां आपण अगदीं थेट वैदिक काळचा हरिश्चंद्र कसा होता तें पाहूं या' (भा. सं. पा. ३४) अशी प्रस्तावना करून ऐतरेय ब्राह्मणांतील हरिश्चंद्राचें आख्यान पंडितजींनीं कथन केलें आहे. तें वाचून वैदिक संस्कृतीबद्दलचा असलेला अभिमान पार विलयाला जातो. या वैदिक हरिश्चंद्राला आदर्श म्हणून आजपर्यंत कोणींच गौरविलेलें आमच्या पाहण्यांत नाहीं. तो कोणत्या अर्थानें आदर्श हें एक पंडित सातवळेकरच जाणोत !

ऐतरेय ब्राह्मणांतील कथा थोडक्यांत खालील-प्रमाणें आहे: हरिश्चंद्र या नांवाच्या एका इक्ष्वाकु-कुलांतील राजाला शंभर बायका असून एकहि पुत्र नव्हता. म्हणून त्यानें वरुणाची प्रार्थना केली. वरुणानें पुत्र देण्याचें कबूल केलें. परंतु त्या मुलाचा ताबडतोब बळी दिला पाहिजे अशी अट घातली. पं. सातवळेकरांच्या या आदर्श वैदिक हरिश्चंद्रानें ती मान्य केली. पुढें पुत्र झाला. तेव्हां या अस्सल वैदिक हरिश्चंद्रानें वरुणास थापा मारून फसविण्यास सुरुवात केली. 'बारा दिवसांचा झाला म्हणजे बळी देतों', 'दांत आले म्हणजे बळी देतों', 'मुंज झाली म्हणजे बळी देतों' असे अनेक वायदे या आदर्श राजानें प्रत्यक्ष वरुणदेवास केले व त्यांपैकीं एकहि पुरा केला नाहीं. हें या वैदिक हरिश्चंद्राचें वर्तन पं. सातवळेकरांस आदर्शभूत वाटत असलें तरी तें वैदिक देवता जी वरुण तिला पसंत पडलें नाहीं व त्यानें रागावून हरिश्चंद्राच्या पोटांत जलोदर नांवाचा रोग निर्माण केला. तेव्हां हरिश्चंद्राचा पुत्र रोहित यानें एक तोड काढिली. अरण्यांत जाऊन अजीगर्त नांवाच्या भुकेनें गांजलेल्या एका ब्राह्मणास शंभर मोहरा देऊन त्याचा शुनःशेप नांवाचा मुलगा बळी देण्यास विकत घेतला व आपणाऐवजीं या गरीब बिचाऱ्या ब्राह्मणपुत्राचा स्वीकार करावा अशी वरुणाची प्रार्थना केली. वरुणानें ती मान्य केली व शुनःशेपास बळी देण्याकरितां खांबाला बांधण्यांत आलें. परंतु त्यानें भक्तिभावानें सर्व देवांना आळविल्यामुळें त्याची अखेर सुटका झाली.—अशी ही थोडक्यांत कथा आहे.

या कथेंतील हरिश्चंद्र वैदिक आदर्श म्हणून पं. सातवळेकर जनतेपुढें मांडीत आहेत. त्यांत त्यांचा काय हेतु आहे हें तेच एक जाणूं शकतात. या वैदिक हरिश्चंद्राचा थापेबाजीचा गुण अनुकरणीय आहे असें पंडितजींस वाटतें कीं स्वतःकरितां एका गरीब आपद्ग्रस्त ब्राह्मणाचा मुलगा बळी देण्यामध्यें प्रकट होणारें त्याचें प्रजावात्सल्य त्यांस अनुकरणीय वाटतें कीं आणखी एखादा अजब 'राष्ट्रीय गुण' त्यांना या चरित्रांत दिसतो, हें वाचकांनींच ठरवावें. आम्हांला तर हें चरित्र वाचून ओकारीच येते. या चरित्रावरून या वैदिक हरिश्चंद्राचीच कींव करावी असें वाटतें, एवढेंच नव्हे तर वैदिक, संस्कृतीबद्दलहि अनेक प्रश्न उत्पन्न होतात :

(१) ज्या वैदिक संस्कृतीची वेळीं-अवेळीं पं. सातवळेकर इतकी स्तुति करीत असतात त्या वैदिक संस्कृतीमध्यें एका ब्राह्मणावर आपलें पोट जाळण्याकरितां, पोटचा गोळा बळी देण्याची, तो विकण्याची पाळी येते ती आदर्श कशी? (२) बरें, या दारिद्र्याची दखलगिरी घेण्याचें दूरच राहो, त्याच्या अडचणींच्या फायदा घेणारा राजा आदर्श म्हणून मिरवावा काय? हें वैदिक राजाचें प्रजावात्सल्य काय? (३) साध्या पशूंसच नव्हे तर माणसांसहि बळी देणारी ही वैदिक संस्कृति संस्कृति या नांवास तरी पात्र आहे काय?

पं. सातवळेकर यांनीं बुद्धोत्तरकालीन हरिश्चंद्रा-








च्या चरित्रावर काढिलेल्या आक्षेपांस उत्तर देऊन झालें व त्यांच्या लाडक्या वैदिक हरिश्चंद्राचेंहि यथार्थ स्वरूप वाचकांपुढें मांडलें. आतां जातां जातां पं. सातवळेकर यांच्या लेखनांतील हातचलाखीची जाणीव वाचकांस करून देण्याकरितां याच हरिश्चंद्राच्या लेखांत त्यांनीं अजीगर्ताच्या निलाजरेपणावर पांघरूण घालून त्यावर स्वार्थत्यागाचा मुखवटा बसविण्याचा कसा अश्लाघ्य प्रयत्न केला आहे, हें वाचकांसमोर मांडतों : या गोष्टीच्या समारोपांत पंडित म्हणतात : ' क्षत्रियाचा बचाव करण्याकरितां ब्राह्मणहि तयार असत, असा हा काळ होता. ज्या ब्राह्मणांनीं आत्मबलिदान करून क्षत्रियांचें संरक्षण केलें तेच क्षत्रिय आज ब्राह्मणांवर उठलेले दिसत आहेत. ' ( भा. सं., पा. ३५ ) अजीगर्तानें आपला मुलगा शुनःशेप याचें हरिश्चंद्राच्या मुलाचे प्राण वांचविण्याकरिता बलिदान केलें असें म्हणणें हा वस्तुस्थितीचा शुद्ध विपर्यास आहे. अजीगर्त हा भुकेनें पीडलेला असल्यामुळें केवळ पोटाकरितां त्यानें आपला मुलगा विकला असें मनु स्पष्ट म्हणत आहे : ( मनु. १०—१०५ )

' अजीगर्तः सुतं हन्तुमुपासर्पद् बुभुक्षितः ।
न चालिप्यत पापेन क्षुत्प्रतीकारमाचरन् ॥ '

ऐतरेय ब्राह्मणांतील कथेंतहि हा निलाजरा ब्राह्मण पोटाकरितां एकदांच मुलाचे पैसे घेऊन राहिला नाहीं तर पुढें त्या मुलाला कोणी बांधावयास मिळेना त्या वेळीं अजीगर्त म्हणतो : ' मला आणखी शंभर मोहरा द्या म्हणजे मी त्या मुलाला बांधतों. ' एवढेंच नव्हे तर पुढें त्या मुलावर शस्त्र चालविण्यासहि कोणी तयार होईना तेव्हां हा अजीगर्त म्हणतो, ' मला आणखी शंभर मोहरा द्या म्हणजे मी याचे तुकडे तुकडे करितों. ' असा हा अजीगर्त क्षत्रियांकरितां आत्मबलिदान करणारा वैदिक काळचा आदर्श ब्राह्मण कीं नराधम हें वाचकांनींच ठरवावें !

शेवटीं पं. सातवळेकर यांस नम्रपणें असें सुचवावेसें वाटतें कीं, ते ( भा. सं., पान ३० वर ) म्हणतात त्याप्रमाणें ' सत्यव्रत हरिश्चंद्राचा आदर्श पुढें ठेवल्यामुळें हिंदूंना निरनिराळ्या प्रकारच्या डोंबांच्या घरीं वारंवार गुलाम बनून विकत जाण्याची पाळी येत असते ' असें नसून, हिंदूंच्या गुलामगिरीचीं कारणें सत्यनिष्ठेंत शोधण्यापेक्षां त्यांनीं तीं अन्यत्र शोधावीं. खरोखरीं आजच्या अगर ऐतिहासिक कोणत्याहि कालखंडाकडे पाहिलें तरी सत्यनिष्ठेमुळें आमचें स्वातंत्र्य गेलें असें दाखवितां येणार नाहीं. उलट पक्षीं, आज सत्यनिष्ठाच सुटल्यामुळें सर्वत्र कशी बजबजपुरी माजलेली आहे हें सिद्ध करण्यास पुरावे गोळा करण्याची आवश्यकता नाहीं. असें असतां सत्यव्रत हरिश्चंद्राचा आदर्श जनतेपुढें ठेवण्याऐवजीं ऐतरेय ब्राह्मणांतील थापाड्या व स्वार्थी अप्रसिद्ध हरिश्चंद्राचा ते गौरव करतात हें आश्चर्य आहे. हरिश्चंद्रासारखे निर्मळ सत्याचे आदर्श हे ' दूरचे दिवे ' आहेत. ते सर्वांच्या हातीं लागण्यासारखे नाहींत. तरी प्रत्येकानें आपापल्या ताकदीप्रमाणें ह्या ' दूरच्या दिव्यां 'च्या प्रकाशांत आपला मार्ग शोधून दिवसेंदिवस अधिकाधिक त्या दिव्यांच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करावा व तोंपर्यंत आपल्या अपूर्णतेबद्दल अगर दुसऱ्याच्या अपूर्णतेबद्दल वाजवीपेक्षां फाजील खंत बाळगूं नये, असा व्यावहारिक उपदेश करणें वेगळें व त्या आदर्शभूत दिव्यांकडे पाठ फिरवून असत्याच्या घोर अंधकारांत, स्वार्थाच्या चिखलांत लोळत राहावें हें शिकविणें वेगळें !

---

## सत्य आणि माया

' मला विश्वाचें सत्य समजून घ्यावयाचें आहे '—तत्त्वज्ञ आग्रहानें प्रतिपादीत होता.

आणि बोलतां बोलतां समोरच्या आयन्यांत आपल्या छबीची छाया त्यानें नीट न्याहाळून घेतली.

—डी. एच्. लॉरेन्स








सौ. मालती बेडेकर

# जगांतील शांतताप्रिय जनतेचें प्रातिनिधिक दर्शन

ज्या वेळीं व्हिएन्नाला १२।१२।१९५२ पासून भरणाऱ्या शांतता-परिषदेला जायचें असा मनाशीं निर्णय घेतला, तेव्हां मन सारखें विचार करीत होतें : आपण तर कम्यूनिस्ट नाहीं. तेथें जाण्यानें उगीचच कम्यूनिझमची ' झूल ' किंवा ' भूत ' अंगाला बाधायचें !

१९५२ च्या नोव्हेंबरमध्यें पुण्याच्या शांतता-परिषदेंत प्रथम भाग घेतला तेव्हांसुद्धां शांतता-परिषदेच्या तटस्थ भूमिकेबद्दल शंकाच वाटत होती. ' शांतता-परिषदें 'त कोणाहि व्यक्तीला कोणतेंहि मत मांडण्याचें स्वातंत्र्य आहे. जगांत शांतता असावी, युद्धें नकोत, हिंसक अस्त्रें वापरण्यास बंदी असावी, असें वाटणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीला शांतता-परिषदेंत भाग घेतां येतो असें जेव्हां मला सांगितलें गेलें तेव्हां मीं सभेच्या सूत्रधारांना म्हटलें : " तुम्ही तर कम्यूनिस्टच आहां. आज तुम्हांला शांतता हवी आहे म्हणतां. पण उद्यां युद्ध पेटून रशियाविरुद्ध अमेरिका असा सामना ठाकला तर तुम्हीच लोक ' लढाईला तयार व्हा, तटस्थता काय कामाची ? ' म्हणून पुकारा कराल, त्याचें काय ? आमच्यासारखीं माणसें शांतता हवी म्हणून शांतता-परिषदेंत आलीं, तरी आम्ही तुमच्या मताशीं सहमत होणें शक्य नाहीं. आम्हांला अमेरिका-इंग्लंडकडून गळचेपी नको तशीच रशियाकडूनहि नको. ह्या दोहोंपैकीं कोणीहि कुरापत काढली तरी आम्ही शांतता-परिषदेंत त्याचा धिक्कारच करूं. याला तुम्ही लोक कितपत सवड द्याल ? "

माझ्या या म्हणण्यावर सूत्रधारांनीं मला म्हटलें : " तुम्हांला जगांत शांतता नांदावी असें वाटतें ना ? मग तुम्हांला अमेरिकेविरुद्ध किंवा रशिया-विरुद्धहि तटस्थतेचें जरूर मंडन करतां येईल. "

हीच सामान्य माणसांपैकीं एकाची भूमिका म्हणून मीं पुण्याच्या शांतता-परिषदेंत भाग घेतला. आणि आनंदाची गोष्ट अशी कीं, नुकत्याच झालेल्या पार्लमेंटच्या बैठकींत पं. जवाहरलाल नेहरूंनीं कम्यूनिस्ट मेंबरांना आपल्या देशाच्या तटस्थतेचें रूप जाणवून देतांना असेंच म्हटलें कीं, आम्हांला अमेरिकन ब्लॉकमध्यें जाणें नको, तसेंच दुसऱ्या रशियन ब्लॉकमध्यें जाणेंहि नको. हिंदुस्थानला ही तटस्थतेची भूमिका प्रामाणिकपणें पाळतां आली तर हिंदुस्थानला आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत केवढें महत्त्व प्राप्त होणार आहे ! हिंदुस्थानच्या विशिष्ट भूमिकेनें आजहि हिंदुस्थानच्या मताला किती तरी महत्त्व आहे ! अनेक देशांतील लोक हिंदुस्थानकडे किती आशेनें पाहातात हें प्रत्यक्ष पाहाण्याचा योग मला व्हिएन्ना-परिषदेला हजर राहिल्यामुळें लाभला, हें मी माझें भाग्य समजतें.

स्वातंत्र्यानंतर पुनर्रचना करण्यांत हिंदुस्थान-सारख्या शांतताप्रिय देशाला जवळून अगर दुरून युद्धाचे ढग दिसायला नकोत. कारण ज्या प्रगतीचा पल्ला गांठायला हवा आहे, त्या प्रगतीची युद्धानें अपरिमित हानि होईल. लढाई सुरू झाली आणि त्यांत भाग घेतला कीं तात्पुरती बेकारी नष्ट झाल्यासारखी वाटून कृत्रिम सुबत्तेचा जणुं ज्वर भरल्यासारखें देशांत होतें ! पण लढाई थांबतांच देशाची काय अवस्था होते हें गेलीं सात वर्षें आपल्याला सांगत नाहींत काय ? लढाईनंतर








# जगांतील शांतताप्रिय जनतेचें प्रातिनिधिक दर्शन

बेकारी नि महागाईचें भूत मात्र बोकांडीं बसलें. त्या दुर्दैवी वरवंट्याखालीं रगडला गेला नाहीं असा नव्वद टक्के जनतेंतील माणूस विरळा! लढाई झाली आणि देशांत बाहेरून येणारें धान्य थांबलें तर उपाशीच मरायची पाळी. कारण इतकी छातीपीट करून शांततेच्या गेल्या सात वर्षांतहि देश अजून धान्याच्या बाबतींत स्वयंपूर्ण झालेला नाहीं. आपल्याला धान्यासाठीं ज्या देशांकडे तोंड वेंगाडावें लागतें ते आपली तटस्थता तरी कितपत टिकूं देतील? युद्ध सुरू झालें तर तटस्थतेसाठींहि तारेवरचा नाचच करावा लागणार आहे.—साध्यासुध्या माणसांच्या मनांत सहजासहजीं येणाऱ्या अशा कांहींशा विचारांनीं शांततापरिषदेंत भाग घ्यायचें नक्की ठरवून व्हिएन्नाला मी निघालें.

इंग्लंड-अमेरिकेंत हजारों माणसें जातात. हजारों हजार तज्ज्ञांची सकारण-अकारण आयात त्या देशांतून 'हिंदुस्थानच्या भल्या'साठीं करण्यांत येत आहे. 'अमेरिकनवार्ताहरा'सारखीं वर्तमानपत्रें अमेरिकेचा प्रचार करायला राजरोस हिंदुस्थानांत ठाण मांडून बसलीं आहेत. हजारों रुपयांच्या शेंकडों स्कॉलरशिपांनीं हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांना अमेरिका-इंग्लंडच्या वातावरणाशीं समरस करून त्या देशांचे भाट परत हिंदुस्थानांत पाठविण्याचें काम सतत चाललें आहे. त्यांच्या शेंकडों बातम्यांचे चित्रपट नेहमींच दाखविले जात आहेत. पण इतक्या वर्षांच्या दास्यानें इंग्लंड-अमेरिकेचे विचार व संस्कृति हीं इतकीं सायवळणाचीं वाटायला लागलीं आहेत कीं, तिकडून येणारे तज्ज्ञ, वार्तापट, चित्रपट, हिंदी व्यापारी, विद्यार्थी, फिरस्ते हे हिंदुस्थानला वैचारिक दास्य आणीत आहेत, याची जाणीवहि आपल्याला नसते. आज शेंकडों वर्षें त्या देशाचे पोवाडे आपल्याकडील कित्येक सुशिक्षितांनीं गायिले. आतां स्वातंत्र्यानंतर तीच परंपरा चालू राहावी, म्हणून इंग्लंड-अमेरिका येथील सरकारें झटतातच; पण आपलें सरकारहि त्या वैचारिक दास्यासाठीं धडपडत असतें. हें नसानसांतून इंग्लंड-अमेरिकेचें दास्य बाणत असतां रशियाला किंवा चीनला तुलनेनें फार क्वचित् जाणाऱ्या माणसांकडे मात्र बोटें दाखवून 'हे कम्युनिस्ट आले असें' कित्येकांना म्हणावेसें वाटतें! हाहि अमेरिकन किंवा इंग्लिश वैचारिक दास्याचा किंवा तटस्थताशून्यतेचा प्रकार आहे. पण या वैचारिक दास्यांत मीहि सामील होतेंच. म्हणूनच इंग्लंड-अमेरिकेला जाण्याचा योग असता तर विचार केला नसता इतका व्हिएन्नाला जातांना केला. न जाणो, परिषद् हा सगळा कम्युनिस्टांचा बनाव असला तर?

व्हिएन्नाला गेल्यावरहि एक दिवस माझ्या मनांत हा विचार दबा धरून होताच. त्यामुळें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतून आलेल्या व पूर्वी अपरिचित असलेल्या एकूणतीस प्रतिनिधींकडे बघतांना 'हा अर्धा कच्चा कम्यूनिस्ट असावा' अशा शंकेनें मन त्याकडे पाहात राही. पण आमच्यामध्यें, मला वाटतें, चार-पांचच कम्यूनिस्ट मंडळी होती. ती सोडली तर बाकीच्यांची अवस्था अगदीं निराळी होती. मात्र हें पटल्यावर, कदाचित् ती मंडळी माझ्याकडेहि याच शंकेनें पाहात असतील, असेंहि मला कधीं कधीं वाटे! एका आठवड्यांत प्रत्येकाच्या विचारसरणीची स्पष्ट कल्पना आली. ही सारी मंडळी प्रगतिपर विचारसरणीची होती एवढेंच. डॉ. कुमारप्पा हे अगदीं गांधीवादी. गुजरातचे विनूभाई शहा हे विनोबा भाव्यांच्या भूदान चळवळीचे सेक्रेटरी. तेहि कडवे गांधीवादी. कलकत्त्याचे बॅनर्जी हे पार्लमेंटचे सभासद. फॉर्वर्ड ब्लॉकचे श्री. आदित्यन् हे तामीळनाडच्या प्रजापार्टीचे मद्रास असेंब्लीचे मेंबर. श्री. महेशदत्त मिश्र हे मध्यप्रदेशांतील असेंब्लीचे समाजवादी समासद. बावीलाल गोपालकृष्णय्या हे मद्रास असेंब्लीचे स्वतंत्र पक्षाचे सभासद. तुळशीदास जाधव हे महाराष्ट्रांतील शे. का. पक्षाचे असेंब्लीचे सभासद. श्री. रमणलाल देसाई, यशपालजी, गुरुबक्षसिंग, मुल्कराज आनंद ही मंडळी निरनिराळ्या प्रांतांतील प्रसिद्ध लेखक म्हणून आलेली. त्यांतहि निरनिराळे पंथ होते. श्री. पशुपति चटर्जी हे तर बंगालच्या गिरणीमालक-संघाच्या वर्किंग कामिटीचे सभासद होते. ईश्वरभाई पटेल हे गुजरातचे व्यापारी होते. श्री.








रविशंकर रावळ हे सुप्रसिद्ध चित्रकार. ते आर्ट सोसायटीचे एके काळीं व्हाइस प्रेसिडेंट होते. कांहीं वकीलमंडळी होती. गीता मलीक या स्त्रियांमध्यें कार्य करणाऱ्या होत्या. दिल्लीहून आलेल्या श्री. श्रद्धामाता या तर सनातनधर्म-सभेच्या अध्यक्ष असून, त्यांचा आचारविचारांचा सनातनीपणा हा तेथें आलेल्या जगांतील कित्येक प्रतिनिधींच्या कुतूहलाचा विषय होऊन बसला होता.

आमच्या छोट्या ३० प्रतिनिधिमंडळींत जशी सर्व कम्यूनिस्ट ही माझी शंका निराधार ठरली तशीच ती जगांतील दोन-अडीच हजार प्रतिनिधीं-पैकीं कित्येकांच्या बाबतींतहि ठरत गेली. नाना पंथ, नाना मतें असलेले अडीच हजार प्रतिनिधी ८५ देशांतून आले होते : ४६ मुत्सद्दी, १० लष्करी हुद्देदार, ४६ आंतरराष्ट्रीय संस्थांचे कार्यकर्ते, २० मेयर्स आणि कौन्सिलर्स, ६५ धर्मकार्य करणारे धर्मगुरु, ८४ वकील, ९४ शिक्षक, १५७ डॉक्टर व शास्त्रज्ञ, ५६ शिल्पकार व पेंटर्स इत्यादि, २० नट व फिल्म-धंदेवाले, १८९ लेखक व कवी, १९ गायनशास्त्रविशारद, ८ खेळाडू, ६३ कारखानदार, ७५ यंत्रशास्त्रज्ञ, १६० कारकून, ३५ शेतकरी, ३२६ कामगार. ही सर्व देशांतील सर्व प्रतिनिधींची वर्गवारी नसली तरी कम्यूनिझमशीं सुतराम् संबंध नसलेल्या लोकांची वर्गवारी यावरूनहि सामान्यतः सहज दिसण्याजोगी होती. त्या वर्गवारीनें शांतता-परिषदेंत कोणत्याहि धंद्यांतील, कोणत्याहि राजकीय पक्षाचा किंवा तटस्थ मनुष्य भाग घेऊं शकतो हें पाहून कांहींसें आश्चर्य वाटलें.

व्हिएन्ना शहर हें चार सत्तांच्या नियंत्रणांत आहे. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स व रशिया या त्या चार सत्ता होत. या सत्तांच्या तावडींत सांपडलेले व्हिएन्नाचे नागरिक जणुं केव्हांहि लढाई होईल या शंकेनें त्रस्त झाल्यासारखे दिसले. शांतता-परिषद् ही ब्रिटिश-नियंत्रित भागांत भरली होती. साऱ्या युरोपला युद्धाच्या—प्रत्यक्ष युद्धाच्या—खाईंत दोनदां पडावें लागल्यानें, शांततेची किती भयंकर गरज आहे हें युरोपांतील लोकांनाच कळूं शकेल. घराघरांत गोळ्या घुसलेल्या, इमारती धडाधड कोसळून भुईसपाट्या झालेल्या, लक्षावधि लोक मेलेले, त्यांतूनहि अधिक लोक जीवनांतून उध्वस्त झालेले.—अशी परिस्थिति असतांना या सर्व देशांतील बहुसंख्य लोकांना पुनः लढाई म्हणतांच कसें कांपरें भरत असेल याची कल्पनाच केलेली बरी. पाकिस्तान-हिंदुस्थानमुळें उत्तर प्रदेशात व बंगालमध्यें कोट्यवधि लोकांचें जीवन उध्वस्त झालेलें ज्यांनीं सहानुभूतीनें पाहिलें असेल त्यांना अंशतः या लोकांच्या भीतीची कल्पना येईल. ' शांतता परिषद् ' या शब्दांनीं कांहींहि अर्थबोध न होणाऱ्या अनेक देशांतील लोकांचें शांतता-परिषदेबाबतचें औदासीन्य हें युरोपांतील लोकांना आश्चर्याचें वाटतें; कारण त्यांना युद्धाचे प्रत्यक्ष भयानक परिणाम सोसावे लागले आहेत. उलट युद्धाचे अप्रत्यक्ष परिणाम भोगणाऱ्या आपल्यासारख्या देशांना ' शांतता-परिषदे 'चा गवगवा हा निरर्थक वाटतो. पण एवढें खरें कीं, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष लढाईचे परिणाम तितकेच घातक असतात. आणि म्हणूनच जगांत कुठेंहि युद्धें होऊं नयेत हीच सर्व जनतेची इच्छा असते.

व्हिएन्नाला ' आम्हांला शांतता हवी. युद्धें नकोत. ' असें उच्च स्वरानें सांगणाऱ्या हजारों हजार नागरिकांनीं मोठी थोरली मिरवणूक काढली. ती तीन तास चालली होती. त्यांत बायका, पुरुष, म्हातारे, लढाईत जायबंदी झालेले नाना तऱ्हेचे लोक होते. ते ज्या आत्मीयतेनें शांततेची घोषणा करीत होते—ज्या तीव्रतेनें घोषणा करीत होते—त्यामुळें त्यांच्या अंतःकरणांतली शांततेची भूक निःसंशय प्रतीत होत होती.

युद्धाच्या प्रत्यक्ष वणव्यांत पोळलेले अनेक देशांचे प्रतिनिधी शांतता-परिषदेंत होतेच, पण त्या-शिवाय अप्रत्यक्ष युद्धानें टेकीला आलेल्या देशांतील प्रतिनिधीहि होते. बलिष्ठ सत्तांच्या वरवंट्या-खालीं ठेचले जाणारे वसाहतींच्या देशांतील अस्वतंत्र अशा कित्येक देशांतील प्रतिनिधी हजर होते. चीन, उत्तर कोरिया, व्हीटनाम या देशांतील प्रतिनिधींशिवाय आशियांतील निरनिराळ्या देशांचे १५० प्रतिनिधि होते अमेरिका खंडां-तील प्रतिनिधींची संख्या २९३ असून प्रत्यक्ष








# जगांतील शांतताप्रिय जनतेचें प्रातिनिधिक दर्शन

युनायटेड् स्टेटस्‌मधून २७, ब्राझीलमधून ३९, सोव्हिएट यूनिअनमधून ५२, अर्जेन्टिनामधून ४० प्रतिनिधि आले होते. सर्व ८५ देशांची यादी फारच मोठी होईल. म्हणून अंशतःच दिग्दर्शन करणें योग्य होईल.

इटली, फ्रान्स, इंग्लंड या देशांतून आलेल्या प्रतिनिधींची संख्या फारच मोठी होती. इटालियन १९८ प्रतिनिधी हे सरकारच्या विरोधाची पर्वा न करतां आलेले होते. कारण सरकार युद्धाला पुनः उद्युक्त झालें तरी अनेक लोकांना सत्यनाश करणारें तें युद्ध पुनः नकोसें वाटत होतें. फ्रान्समधून १७६ प्रतिनिधी आले होते. इंग्लंडमधील १५२ प्रतिनिधींपैकीं ७५ प्रतिनिधी हे मजूरपक्षाचे सभासद होते. इटालियन प्रतिनिधीनें ' अमेरिकेची सत्ता नको तशाच रशियाचा वैचारिक प्रचार नको ' असें तटस्थ वृत्तीनें भर व्यासपीठावरूनच सांगितलें. तशीच भूमिका अनेकांची होती. युरोपांतील आलेल्या प्रतिनिधींपैकीं कित्येकांना मीं विचारलें असतां कांहींची वर्गवरिष्ठताहि जागी होऊन त्यांनीं म्हटलें, " रशियन्स ? अँः, ते स्लाव्ह आहेत, आम्ही श्रेष्ठ आहोंत. आम्हांला त्यांची फिलॉसफी कांहीं नको ! " एका गृहस्थांनीं तर मला म्हटलें, " आम्हांला शांतता हवी. पण रशियाशीं सोयरसुतकहि नको. " पण ते सर्व शांतता-परिषदेंत समत्वानें आले होते. कारण युरोपांतील लोकांना दोन्ही सत्तांच्या वैचारिक दास्यापासून सुरक्षित राहण्याची इच्छा आहे. सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक सात्र हे तर रशियांतील कम्यूनिझमूचे पक्के विरोधक आहेत. त्यांची लेखणी या विरोधाचें प्रात्यक्षिक नेहमींच दाखवीत असते. पण शांततेचा पुरस्कार करणारांमध्यें ते अग्रेसर आहेत. त्यांनीं शांततेच्या पुरस्कारासाठीं केलेल्या हृदयस्पर्शी भाषणानें प्रतिनिधींचीं व प्रेक्षकांचीं मनें भारावलीं. इटालियन पार्लमेंटरी ग्रुपचे सिनॉर जिसेप्पी निट्टी यांचा शांतता-चळवळीशीं अनेक मुद्यांवर मतभेद होता. पण ' शांतता हवी ' या एका मुद्याशीं ते सहमत असल्यानें त्यांनीं सरकारपक्षीय डेप्युटी प्रतिनिधीहि शांतता-परिषदेला आणले होते आणि व्यासपीठावरून त्यांनीं ठासून सांगितलें कीं, " आम्हां शांततावाद्यांचें सरकारला ऐकावेंच लागेल. कारण आम्हां शांततावाद्यांचेंच सामर्थ्य यापुढें वाढणार आहे. " डॉ कुमारप्पांनीं गांधीजींच्या तत्त्वज्ञानानेंच जगांत शांतता नांदेल असें ठासून सांगितलें तेव्हां त्यांचें म्हणणें न पटणारेहि उत्सुकतेनें ऐकत होते आणि शेवटीं भाषण संपतांच सर्वांनीं टाळ्यांचा गजर केला.

कॉन्‌फरन्सच्या जागीं असे नाना तऱ्हेचे प्रतिनिधी व प्रेक्षक मिळून पांच हजार माणसें बसलेलीं होतीं. जगांतील नाना देशची, नाना भाषा बोलणारी, नाना वर्णांची, निरनिराळ्या पोषाखांची ती सगळी मंडळी एकत्र बसल्यावर सूक्ष्म प्रमाणावर साऱ्या जगांतील लोकांच्या दर्शनानें मन विस्मित झालें ! सर्वांचें तसेंच झालें असावें. शांततेच्या एकाच उद्देशानें एकत्र झालेल्या या अनेक व्यक्तींच्या चेहऱ्यांवरचें कुतूहल, खेळकरपणा, बंधुत्वाची भावना हीं सर्व व्यक्तीच्या एक प्रकारच्या सामाजिक मनाचीं द्योतक होतीं. बलिष्ठ सत्तांकडून त्रस्त झालेल्या जनतेचे प्रतिनिधी तेथें हजर होते. बलिष्ठ राष्ट्रांच्या प्रतिनिधींपैकीं सर्वांना आपापल्या सत्तेनें त्रस्त झालेल्या राष्ट्रांतील जनतेच्या या प्रतिनिधींशीं मैत्री करण्याची जणुं उत्कंठा लागलेली दिसत होती. ' तुम्ही जनतेपैकीं, आम्हीहि जनतेपैकीं. आमचीं सरकारें तुम्हांला त्रस्त करीत असलीं, तरी आम्ही त्यांत भागीदार नाहीं ' असें हे प्रतिनिधी मैत्रीच्या शब्दांनीं व स्पर्शानें जाणवीत होते. कित्येक अमेरिकनांनीं नीग्रोंबरोबर, उत्तर कोरियनांच्याबरोबर, फ्रेंचांनीं व्हीट्नामी लोकांबरोबर आपले फोटो काढून घेतले. उत्तर कोरियाच्या कहाण्यांनीं लोकांच्या डोळ्यांना पाणी आलेंच. उत्तर कोरियन प्रतिनिधीला अक्षरशः उचलून डोक्यावर घेऊन लोकांनीं आपली सहानुभूति व्यक्त केली. त्यांत अमेरिकन प्रतिनिधी मुळींच मागें नव्हते. आफ्रिकेंतील सत्तेखालीं ठेचल्या जाणऱ्या लोकांना त्या त्या सत्ताधारी राष्ट्रांच्या जनतेनें सहानुभूतीच्या हातांनीं अक्षरशः कवटाळलें. हीं सारीं दृश्यें पाहून मन आर्द्र होत होतें. पदोपदीं पटे कीं ती ती बलिष्ठ सत्ता म्हणजे त्या त्या राष्ट्रांतील जनता नव्हे. जनते-








च्या हातीं कांहीं नाहीं. एक अमेरिकन बाई माझ्या शेजारीं डोकें धरून बसल्या होत्या. मीं विचारलें, ' तुम्हांला बरें वाटत नाहीं का ? ' त्यावर एकदम दाटलेल्या गळ्यानें बाई म्हणाल्या, " गेले सहा दिवस पृथ्वीवरील कित्येक देशांतील जनता अमेरिकेच्या नांवानें खडे फोडीत आहे. मला वाटायला लागतं कीं हे सारे लोक अमेरिकन म्हणून आमचा किती तिटकारा करीत असतील ! त्यामुळें मी खिन्न झालें आहे. खरोखर सांगतें, आमच्या देशांतील लोक इतके दुष्ट नाहींत. पण सत्तेपुढें कोण काय करणार ? "

मीं चकित होऊन बाईकडे पाहिलें आणि म्हटलें, " तुमचं म्हणणं खरं आहे. हे लोकहि तुम्हां लोकांचा तिटकारा करीत नाहींत, सत्ताधाऱ्यांचा तिटकारा करीत आहेत, हें नाहीं का तुम्हीं त्यांच्या भाषणांत ऐकलं ? "

ज्यूलिओ क्यूरींच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या या परिषदेंत ज्यूलिओ क्यूरींचें भाषण हें अत्यंत सखोल अभ्यासकानें केलेलें शांततेचें शास्त्रीय विवेचनच म्हणतां येईल.

परिषदेंत दुसरींहि अनेक भाषणें झालीं. त्यांचा निष्कर्ष असा होता :

" जगांत शांतता नांदायची असेल तर जगाला लागलेला तीन तऱ्हांचा ठणका बंद झाला पाहिजे. हें निरनिराळ्या देशांच्या प्रतिनिधींच्या भाषणांनीं अगदीं स्पष्ट झालें. जगांत कोणत्याहि देशाचें स्वातंत्र्यहरण कोणत्याहि देशानें केल्यास शांतता नांदणार नाहीं. स्वातंत्र्य हा सर्वच देशांचा हक्क आहे. वर्णविद्वेषानें शांतता टिकणार नाहीं. वर्णविद्वेष हा मानव्याचा अपमान आहे. कमजोर राष्ट्रांना पुढें करून वरिष्ठ सत्ता भांडूं लागल्या तर शांतता नांदणें शक्य नाहीं. वसाहतींच्या राज्यांतून वरिष्ठ सत्तांनीं चालविलेल्या स्वातंत्र्याच्या गळचेपीनें शांतताभंगच होईल. मनुष्यजातीच्या संहारासाठीं कोरियासारख्या देशांत वापरलीं जाणारीं अस्त्रें हीं अनीतिमान् आहेत. स्वातंत्र्य हा राष्ट्राचा हक्क आहे त्याचप्रमाणें आपल्या देशांतील व्यवस्था आपल्या मर्जीप्रमाणें ठेवण्याचा प्रत्येक देशाला हक्क आहे, त्यांत दुसऱ्या राष्ट्रानें कोणत्याहि सबबीवर हस्तक्षेप करूं नये. "

परिषदेंतील हीं भाषणें ऐकत असतां जगाच्या अवाढव्य क्षेत्रावर कोपऱ्याकोपऱ्यांत पडलेलें दुर्दैवी मानवी जीवन अनेकांना किती अपरिचित असतें याचा जसा मला प्रत्यय आला तसाच कोणत्याहि देशाची कोणतीही शासनसंस्था असो, त्या देशांतील बहुसंख्य जनतेच्या सुखदुःखांबाबत व मतांबाबत ती किती उदासीन असते, हेंहि चांगलेंच प्रत्ययाला आलें.

यामुळेंच बहुतेक राष्ट्रांची सरकारें शांतता-परिषदेबाबत विरोधक किंवा उदासीन आहेत ! पण जनता नाहीं. स्वतंत्र देशांत घ्या, वसाहतींत घ्या किंवा गुलाम राष्ट्रांत घ्या, सर्व राष्ट्रांतील बहुसंख्य जनतेचा जीवनाचा जाच कसकशा तऱ्हेनें चालला आहे हें जगाचें हृदयस्पर्शी शब्दचित्र शांतता-परिषदेंत पदोपदीं पाहावयास मिळत होतें. साऱ्या जगाच्या एकसमया-वच्छेदानें पाहावयास मिळालेल्या या चित्रा-मुळें, कांहीं अमर्याद, अमानुष शक्तींनीं आणि सत्तांनीं जगाला कसें गांजून टाकलें आहे याचें स्पष्ट स्वरूप कळलें. त्या शक्तींना वेळींच पायबंद घालण्यासाठीं जगांतील जनतेनें केवळ शांततेच्या एकाच अहिंसक भूमिकेनें कसें एकत्रित झालें पाहिजे याची कुणालाहि खात्री पटली असती. जितकी अधिकाधिक जनता निरनिराळ्या राष्ट्रांतून या शांतता-परिषदेंत सामील होईल, तेवढी ती एकमेकांच्या सहानुभूतीच्या जोरावर आपापल्या देशांत अधिकाधिक बलिष्ठ होत जाऊन युद्धोत्सुक सत्तांना जोरदार प्रतिकार करण्यास समर्थ होईल, हें कुणालाहि स्पष्ट कळलें असतें.

हिंदुस्थाननें कोरियाच्या प्रश्नांत मन घालून केलेल्या सूचनांकडे तर सर्व राष्ट्रांचे डोळे लाग-लेले होतेच; पण कोरियाबाबत शांतता परिषदेंत हिंदी प्रतिनिधींनीं केलेल्या सूचनांचेंहि शांतता-परिषदेनें स्वागत केलें. खरीखुरी तटस्थता पाळ-ण्याचा हिंदुस्थान सरकारचा व जनतेचा निर्धार हा जगांतील शांततेचा मोठा आधार आहे. सारीं राष्ट्रें आपल्या देशाकडे आशेनें पाहात आहेत.








## जगांतील शांतताप्रिय जनतेचें प्रातिनिधिक दर्शन

इंग्लंड-अमेरिका, रशिया, फ्रान्स इत्यादि बलिष्ठ म्हणून गणल्या जाणाऱ्या सत्तांच्या सहानुभूतीच्या हस्तस्पर्शाकडेहि सर्वांनीं जपून पाहिलें पाहिजे. त्यांपैकीं कोणाचेंहि वैचारिक दास्य किंवा आर्थिक दास्य न पत्करतां, त्याच्या लहरीनें न नाचतां, स्वतःचें स्वत्व व स्वातंत्र्य राखण्यासाठीं आपल्या देशानें किती जागरूक राहिलें पाहिजे! त्यानेंच खरी तटस्थता राहील. सर्व परतंत्र देशांच्या दुःखांचें मूळ आर्थिक व वैचारिक दास्यांतच आहे, त्यांतूनच वर्णद्वेषाचा विषवृक्ष फोंफावतो हें सांगून, साऱ्या देशाच्या कहाण्या पुनः पुनः जणुं सर्वांना जागरूक करीत होत्या! शांतता-परिषद् ही कोण्या राष्ट्राच्या हातचें खेळणें होऊं न देणें हें सर्व राष्ट्रांतील जनतेचें कर्तव्य आहे. या बाबतींत परिषदेचे अध्यक्ष ज्यूलिओ क्यूरी यांनीं आपल्या भाषणांत, सिनॉर निट्टींना आश्वासन देऊन, भिन्न भिन्न जीवनसरणींच्या परंतु शांतता राखायची कळकळ बाळगणाऱ्या लोकांना मोकळेपणानें व परिणामकारक रीतीनें विचारविनिमय करण्याकरितां एकत्र आणणें हेंच परिषदेचें उद्दिष्ट होय, असें सांगितलें. ते म्हणाले :

"I should like here to repeat that the guarantees, which Sig. Nitti sought from me, will be fully satisfied and that the intention of the promoters of this Congress is solely to gather together for a frank and effective discussion, persons devoted to different ways of life but desirous of finding together the answers to the problems which disturb all, sincerely desirous of preserving peace."

हें शांतता-परिषदेचें धोरण कडकपणें पाळलें जाईल हें आपल्यासारख्या तटस्थ देशानें शांतता-परिषदेंत भाग घेऊन जरूर पाहिलें पाहिजे. कारण हिंदुस्थान हीच सत्य, अहिंसा व शांतता या बाबतींत जगाची एक आशा आहे हें निश्चित.

---

<u>पुस्तकपरीक्षण</u>

### 'लोकशाहीचा अर्थव्यवहार' लेखक : श्री. द. कुलकर्णी

(प्रकाशक : व्हीनस बुक स्टॉल १९५३. किंमत रु. ६-४-०.)

सरकारच्या आयव्ययी धोरणाचें अर्थशास्त्र समजावून सांगणारें हें पुस्तक आहे. हें धोरण राज्यसरकारें व राष्ट्रसरकार यांच्या अंदाजपत्रकांतूनच स्पष्ट होत असतें. आजच्या युगांत या वार्षिक अंदाजपत्रकांची महती अत्यंत वाढली आहे. सरकारच्या हातीं आयरूपानें जमा होणारा पैसा हा एकूण राष्ट्रीय उत्पन्नाचा एक महत्त्वाचा भाग असतो. या आयव्ययी धोरणाचे एकूण राष्ट्रीय अर्थव्यवस्थेवर होणारे परिणामहि महत्त्वाचे व दूरगामी असतात. राष्ट्रांतील संपत्तीचें उत्पादन, विभाजन व उपभोग या तीनहि गोष्टी या धोरणाशीं निकटपणें निगडित असतात. युद्धकाल, आर्थिक मंदीचा काळ अशा आणीबाणीच्या प्रसंगीं या धोरणाचीं सूत्रें नीटपणें सांभाळणें अगत्याचें असतें. अंदाजपत्रकी धोरणाचा अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासाशींहि कसा महत्त्वाचा संबंध असतो हेंहि चलनवाढीच्या अंदाजपत्रकी धोरणाविषयीं झालेल्या व चालू असलेल्या चर्चेनें आढळून येतें. यामुळें या विषयाचें शास्त्रशुद्ध ज्ञान जनतेंत जितकें अधिक प्रसार पावेल तितकें हवेंच आहे.

या दृष्टीनें हें पुस्तक स्वागतार्ह वाटतें. संस्कृतच्या अभ्यासकानें तें लिहिलें असलें तरीहि अर्थशास्त्राचा आवश्यक तो नीट अभ्यास करून तें नीटस लिहिलें आहे. या विषयावरील आजच्या विचाराचें संकलन या पुस्तकांत मिळूं शकेल. पदवी-शिक्षणासाठींहि या विषयावरील मराठी भाषेंतील पाठ्यपुस्तक म्हणून या पुस्तकाचा उपयोग होऊं शकेल. जनतेंत ज्ञानप्रसाराचा प्रयत्न व विद्यापीठांत मराठी माध्यम आणावयाची पूर्वतयारी म्हणून वेगवेगळ्या विषयांवरील अशींच पुस्तकें प्रकाशित होणें आवश्यक आहे. या पुस्तकाचे लेखक व प्रकाशक यांचें अभिनंदन.

—दे. अ दाभोलकर.








श्री. हरि कृष्ण मोहनी

# श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे

अखिल भारत-चरखा-संघाचे अलीकडे श्री. **अण्णासाहेब सहस्रबुद्धे** मंत्री आहेत. परंतु गेले कित्येक दिवसांच्या विचारानंतर चांडिल येथें जो निर्णय घेण्यांत आला त्याला अनुसरून, हा देशव्यापी विधायक कार्यकर्त्यांचा चरखा-संघ सर्व-सेवा-संघांत सांप्रत विलीन झालेला आहे. आणि श्री. अण्णासाहेबांच्या मार्गदर्शनाखालीं चरखा-संघाचें नवसंस्करण सध्यां चाललेलें आहे. त्या निमित्तानें त्यांच्या असाधारण व्यक्तिमत्वाचा परिचय करून देण्याचें योजिलें आहे.

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्या चरित्रा-बद्दल जी थोडी माहिती मिळूं शकते, तीवरून दिसून येईल कीं, गांधीमताच्या विधायक कार्य-कर्त्यांमध्यें त्यांचें स्थान फार मोठें आहे. हें थोर स्थान त्यांनीं आपल्या मूळच्या अंगभूत अशा अनेक गुणांमुळें निर्माण केलेलें आहे. गेल्या तीस वर्षांत विधायक कार्याव्यतिरिक्त त्यांनीं दुसरें कांहीं केलेलें नाहीं. इतका निरसलपणानें कार्य करणारा सेवापरायण कार्यकर्ता अत्यंत विरळा आहे. त्यांना स्वतःचें खासगी असें जीवनच माहीत नाहीं. रात्रंदिवस लोकांचें, जनतेचें, समाजाचें काम करीत राहणें हाच त्यांचा हव्यास बनलेला आहे. आणि त्यांच्या स्वभावांतील अत्यंत महत्त्वाचा गुण हा आहे कीं, हें समाजाचें कार्य करीत असतांना, आपण कांहीं इतरांपेक्षां विशेष करीत आहों, आपण समाजाचें भलें करीत आहों, कोणावर तरी उपकार करीत आहों, ह्याचें भानच मुळीं त्यांना नाहीं, असें आढळून येतें. त्यांचें आचरण चिकित्सक बुद्धीनें पाहिल्यानंतर आणि सूक्ष्मपणानें त्यांच्या स्वभावाची छाननी केल्यानंतरहि हाच ग्रह दृढ होतो. ह्या पुरुषाचा अहंभाव कोठें दडून राहिला आहे, ह्याचा पत्ता लागत नाहीं. ह्या थोर पुरुषानें सेवेमध्यें समरस होऊन, आत्म-समर्पणाची पराकाष्ठा केली आहे असें सुजाणपणानें मनुष्यस्वभावाचें निरीक्षण करणारांस आढळून आल्याखेरीज राहणार नाहीं. सत्कार्यविस्मृतीचा हा अण्णासाहेबांचा गुण अनन्यसाधारण आहे. ‘ The most virtuous of all men is he that contents himself with being virtuous without seeking to appear so. ’ ह्या प्लेटोच्या विधानाची सत्यता अण्णा-साहेबांची स्वभावरचना पाहून कळून येते.

अण्णासाहेबांनीं हा गुण आध्यात्मिक निष्ठेनें, धार्मिक तपश्चर्येनें निर्माण केला आहे असें म्हणतां येणार नाहीं. अध्यात्मसाधना करणारांसहि आपण कांहीं विशेष कमाविलेलें आहे, आपण पुण्य गाठीं सांठविलेलें आहे ह्या जाणिवेची बाधा होतच राहते. अध्यात्मसाधनेची विस्मृति असलेले अध्यात्म-साधक अपवादभूत असतात. अध्यात्मसाधनेची खरी परिसमाप्ति आत्मविसर्जनांत, निरहंकारी वृत्तींत दडलेली असते. आणि दशावतारी गंजीफा खेळणारे जसे ‘ अखेरी ’ साधली म्हणजे खेळांत कृतकृत्य होतात, त्याप्रमाणें अध्यात्मसाधक आत्म-विस्मृतीची अखेरी साधण्यांत धन्यता मानतात. अण्णासाहेबांस आयुष्यांतील साधनेची ही खरी अखेरी मारण्याची युक्ति सहजच साध्य झाल्या-सारखी वाटते.

अण्णासाहेबांच्या आतांपर्यंतच्या आयुष्याचे तीन विभाग कल्पितां येण्यासारखे आहेत. लोकमान्य टिळक यांच्या मृत्यूनें झालेल्या खोल संस्कारामुळें देशकार्य करण्याची त्यांनीं आपल्या तरुणपणांत प्रतिज्ञा केली. ह्या प्रतिज्ञेपूर्वी देखील पहिल्या जागतिक लढाईच्या काळांत, कॉलेजच्या लष्करी शिक्षण देणाऱ्या इं. डि. फो. च्या पथकामध्यें त्यांनीं आपलें नांव दाखल केलें होतें आणि हें लष्करी शिक्षण घेऊन क्रांतिकारक मार्गानें आपल्या देशाची सेवा करण्याचा मनसुबा त्यांनीं रचला होता. देशकार्यांत आयुष्य वेंचण्याची त्यांच्या मनाची तयारी ह्या प्रतिज्ञेच्या पूर्वींच कांहीं वर्षें झालेली होती. लोकमान्य टिळकांचा मृत्यु हा एक उदात्तगंभीर प्रसंग म्हणून त्यांच्या उन्नतीस, हृदयपरिवर्तनास साधनीभूत बनला








एवढेंच म्हणतां येण्यासारखें आहे. लोकमान्य टिळकांच्या आदर्शानें, विद्यार्थीदशेंत समजूं लागल्यापासून, त्यांच्या हृदयांत ठाण मांडलेलें होतें आणि त्या भावनेचें पर्यवसान ह्या प्रतिज्ञेंत झालें असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. कॉलेजांतील शिक्षणापासून किंवा महात्मा गांधीजींच्या असहयोगाच्या आंदोलनापासून तो चरखा-संघामध्यें अण्णासाहेब सामील झाले तेव्हां-पर्यंत त्यांच्या आयुष्याचा एक टप्पा आहे असें मानतां येईल. ह्या काळांत त्यांच्या सेवाव्रताचा पाया पक्का भरला गेला असें समजलें पाहिजे. विशेषतः चिंचवडच्या स्वावलंबी विद्यालयांत त्यांनीं अनेक प्रकारचे आत्मोन्नतिकारक अनुभव मिळविले. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या इतिहासांत चिंचवडच्या पाठशाळेनें एक नवीनच दालन उघडलें होतें. चिंचवडच्या राष्ट्रीय पाठशाळेनें शिक्षणाबद्दलचे ठराविक विचार सोडून स्वतंत्रपणानें क्रांतिकारक मनोवृत्तीनें शिक्षणशास्त्राचा विचार करून एका लहान क्षेत्रांत ते विचार पडताळून पाहण्याचा प्रयोग केला होता. अण्णासाहेबांचें शिक्षणाबद्दलचे विचार सध्यांदेखील स्वतंत्र आहेत व ते अनेक वर्षांच्या परिशीलनानें परिणति पावलेले आहेत. ह्या शैक्षणिक नवीन विचारांचा आरंभ त्यांनीं चिंचवडच्या पाठशाळेंत केला आणि स्वावलंबनाचें तत्त्व आपल्या अंगांत व आचरणांत मुरविलें. इंग्रजी शिक्षण घेत असलेला मनुष्य—विशेषतः पदवीधर—बौद्धिक विचारानें परंपरागत जातिभिन्नतेच्या, उच्चनीच भावनेच्या आणि श्रेष्ठ-कनिष्ठ राहणीमुळें निर्माण झालेल्या इभ्रतीच्या कल्पनेमुळें सामान्य लोकांपासून, जनसमूहापासून स्वतःस भिन्न समजतो. स्वतःचा निराळेपणा त्यास सारखा प्रतीत होत असतो. वर्ग-विहीन, एकजिनसी समाज बनविण्यास त्याच्या मनोवृत्तीची अत्यंत प्रतिकूलता असते. आणि त्याच्या शिक्षित मनाभोंवतीं अनेक प्रकारचीं वैचारिक जाळीं, कोळिष्टकें तयार झालेलीं असतात. चिंचवडच्या त्या स्वावलंबी पाठशाळेमध्यें अण्णासाहेबांनीं ह्या सामाजिक नानाविध भेदांस फांटा देण्याचे बुद्धिपूर्वक प्रयत्न करून स्वतः धडे घेतले. स्वतःच्या मनांत खोल गेलेले असे जनमानसाशीं समरस होण्यांत आडकाठी आणणारे अनेक गंड, कोश, पापुद्रे त्यांनीं हलक्या हातानें दूर करून स्वतःचें मन साफ केलें. समाजाशीं एकजीव होण्याचें शिक्षण स्वतः मिळविलें. स्वावलंबी पाठशाळेमध्यें अण्णासाहेबांचें निरहंकारी मन तयार झालें, त्यांचें व्यक्तित्व विकास पावलें. हा त्यांना फार मोठा लाभ झाला. चिंचवड येथें अनेक प्रकारच्या काबाडकष्टांनीं किंवा तपश्चर्येनें त्यांनीं आपल्या शरीरास झिजविलें. खाणेंपिणें, वस्त्र-प्रावरण ह्यांविषयींच्या पूर्ण बेफिकिरींत त्यांचें शरीर तयार झालें. स्वावलंबी शिक्षणाचा हा मार्ग आक्रमण करीत असतांना मोठ्या कल्पना, मोठे प्रयोग, यशस्वी करण्यांत कशा व किती अडचणी येतात हें स्वानुभवानें त्यांना कळून आलें. अपयशानें नामोहरम होणें ही गोष्ट अण्णासाहेबांच्या स्वभावास ठाऊकच नाहीं. एक प्रयोग अयशस्वी झाल्यानंतर दुसरा प्रयोग तितक्याच उत्कटतेनें व उत्साहानें हातीं घेणें हा त्यांचा हातचा मळ बनला आहे. स्वावलंबी शेती, साक्षरता-प्रचार, पडीक जमिनीची मशागत, खेड्यांतील जीवनाशीं समरसता अशांसारखे अनेक उद्योग त्यांनीं केले आणि ह्या प्रयोगांमुळें फलप्राप्ति कितपत होऊं शकते ह्याची अटकळ बांधण्याची त्यांच्या मनास संवय लागली. ह्या काळांत आत्मसमर्पणाची वृत्ति अण्णासाहेबांनीं स्वतःच्या स्वभावामध्यें रुजविली असें म्हणतां येतें.

चरखा-संघामध्यें अण्णासाहेबांचें जवळजवळ एक तप गेलें. कॉलेज सोडल्यानंतर पहिल्या बारा वर्षांत जी तपश्चर्या त्यांनीं केली, तिचेंच फळ चरखा-संघाच्या कार्यामध्यें त्यांच्या पदरांत पडलें. फळ ह्याचा अर्थ खुषीनें अधिक कष्ट करण्याची तयारी एवढाच करणें योग्य आहे. महाराष्ट्र-चरखा-संघाचे मंत्री म्हणून जें कार्य त्यांना करावें लागलें त्याची तुलना 'पिल्ग्रिम फादर्स' ह्यांना जे कष्ट अमेरिकेंतील वसाहत करतांना अंगीकारावे लागले त्याच्याशींच करतां येईल. सेटपल्ली हें गांव ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना ह्या कष्टांची खरी कल्पना येऊं शकेल. अल्ला हजरतांचें राज्य,









अत्यंत खालावलेलें तेथील जीवन, दारूबाज मजुरांशीं गांठ, रेल्वेपासून अत्यंत दूर अशा प्रदेशांत राहणारे रानावनांतील असंस्कृत लोक, अशा लोकांमध्यें नवीन प्राण ओतावयाचा, त्यांना मजुरी नियमित मिळविण्याची संवय प्रेमानें लावावयाची, त्यांच्यांतून चरखा संघाच्या कार्यासाठीं योग्य निवड करावयाची, मैलोगणतीं पायीं प्रवास करावयाचा आणि हें सर्व काम दरिद्रनारायणाची पूजा म्हणून समजावयाचें. ह्या पूजा बांधणारा अण्णासाहेबांसारखा पुजारी भेटला म्हणूनच महाराष्ट्र-चरखा-संघाचें कार्य इतकें उठावदार ठरलें. चिंचवडचे विविध अनुभव, रात्रंदिवस काबाड-कष्ट करण्याची संवय, धैर्य, संघटनेचें ज्ञान, खेड्यांतील राहणीशीं एकजीव होण्याची तयारी, ह्या गोष्टी पूर्वींच अंगवळणीं पडल्या नसत्या तर महाराष्ट्र-चरखा-संघाचा जो नांवलौकिक अण्णासाहेबांनीं वाढविला तो त्यांना वाढवितां आला नसता.

महाराष्ट्र-चरखा-संघांतील मंत्रिपदाच्या स्थानामुळेंहि अण्णासाहेबांस अनेक कार्यकर्ते आपल्या कार्यांत जोडतां आले. त्यांच्या स्वभावांतील लोहचुंबकाचे गुण वाढीस लागले. स्वतःच्या मोठेपणाचें प्रदर्शन करण्याचा अण्णासाहेबांचा स्वभाव नसल्यामुळें आपोआप लोकसंग्रह अधिकाधिक होत राहिला. महाराष्ट्रीय कार्यकर्ते हें एक मधमाश्याचें पोळें आहे असें वर्णन अण्णासाहेबांसारख्यांच्या कार्यामुळें व स्वभावामुळें अन्वर्थक होऊं शकतें. काम फार कठीण असलें तरी कार्यकर्त्यांच्या निष्ठेमुळें तें सुलभ होऊं शकतें. अण्णासाहेबांना चरखा-संघाचें कठीण काम अशा निष्ठावान् कार्यकर्त्यांच्या संहतीमुळें सुकर बनवितां आलें.

जेलमध्यें जेव्हां अण्णासाहेब जात—आणि अनेक वेळां त्यांनीं जेलयात्रा केली आहे—तेव्हां कार्यकर्त्यांच्या त्या मेळाव्यांत भरच पडलेली दिसून येई. कारागृह ही एक शिक्षणसंस्थाच ते बनवीत. सी क्लास खुषीनें मागून घेत आणि ह्या काळांत आपल्या लहानमोठ्या सवंगड्यांबरोबर ज्ञान, खेळ व उद्योग अशा उन्नतिकारक व्यवसायांत ते रमून जात.

१९४० ते १९५२ हा त्यांच्या आयुष्याचा तिसरा टप्पा आहे असें मानतां येण्यासारखें आहे. १९४२ सालांतील त्यांची कामगिरी भीषण लढायांतील सेनापतीसारखी आहे. अनेकविध संघटनाचातुर्य, धाडसीपणा, विस्मयकारक औदार्य, तळहातावर शिर नाचविण्याचें अद्‌भुत कौशल्य, रोमहर्षक स्वार्थत्याग इत्यादि गुण अण्णासाहेबांच्या स्वभावांत उच्च कोटीनें वसत आहेत, हें १९४२ सालच्या चळवळीनें दृष्टोत्पत्तीस आलें. त्यांच्या आयुष्याच्या प्रस्तुत विहंगमावलोकनामध्यें व ह्या गांधीप्रणीत विधायक कार्याच्या संदर्भांत, १९४२ मधील त्यांच्या कामगिरीचें वर्णन अनाठायीं वाटण्याचा संभव आहे. पण असाधारण प्रसंगानेंच थोर मनुष्याची कसोटी समजते व त्याचे गुण प्रकट होतात हें विधान ह्या उल्लेखावरून सिद्ध होण्यासारखें आहे. शिवकालीन योद्धयांसारखे वीर आजहि महाराष्ट्रांत विद्यमान आहेत हें कळून येण्यास असे प्रसंगच कारणीभूत होतात.

१९४५ सालानंतर अण्णासाहेबांनीं सातारा व कोल्हापूर जिल्ह्यांत कार्यकर्त्यांचीं अनेक शिबिरें भरविलीं आणि ह्या जिल्ह्यांतील क्रांतिकारक मनोवृत्तीस दिशा लावण्याची खटपट ह्या शिबिरांच्या चळवळीतर्फे अण्णासाहेबांनीं हातीं घेतली. ह्या शिबिरांत सेवादलाचे अनेक उत्साही कार्यकर्ते एकत्रित येत. त्यांस बदललेल्या परिस्थितीचें ज्ञान अण्णासाहेबांनीं करून दिलें. त्यांच्या साहसपूर्ण अशा कामगिरीचा फायदा घेऊन नवीन परिस्थितींत विधायक कार्यास कोणती दिशा लावतां येईल हें त्यांस समजाविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. राजकीय परिस्थिति जसजशी पालटली तसतशी ह्या कार्यकर्त्यांस निरनिराळ्या स्वतंत्र दिशा लागल्या. हे कार्यकर्ते निरनिराळ्या मार्गानें पांगले गेले. परंतु ह्या राजकीय संक्रमणकाळांत अण्णासाहेबांनींच ह्या क्रांतिकारक मनोवृत्तीच्या तरुणांचे मार्गदर्शक पुढारी बनणें ही स्वाभाविकच घटना होती.










# श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे

विधायक कार्य करणें हा जरी अण्णासाहेबांचा स्वभाव बनलेला असला आणि त्यांचे गुण अनन्यसाधारण असले, तरी त्यांच्यासारख्या गांधीमताच्या विधायक कार्यकर्त्यांना, त्यांच्यासारख्या अग्रणींना देखील राजकीय पुढाऱ्यांइतका सन्मान जनतेनें कधींहि दिला नाहीं. विधायक कार्यास महात्मा गांधी जें महत्त्व देत, तितकें महत्त्व इतर राजकीय पुढाऱ्यांनीं दिलेलें नव्हतें. विधायक कार्यास राजकारणाच्या मोजमापानें फार गौण स्थान मिळालेलें होतें आणि म्हणून अण्णासाहेबांसारख्या चतुरस्र विधायक कार्यकर्त्यास जितकें महत्त्व प्रांतात मिळावयास पाहिजे होतें तितकें महत्त्व कधींहि प्राप्त होऊं शकलें नाहीं. खादी हा स्वातंत्र्य-सैनिकांचा केवळ युनिफॉर्म होता. हा युनिफॉर्म बनविण्यास दारुगोळा तयार करणाऱ्याइतकें महत्त्वाचें स्थान मिळूं शकलें नाहीं. कारण खादीचा संबंध अहिंसक समाजरचनेशीं राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं जुळलेला नव्हता. खादीस स्वराज्यसैनिकांच्या पेहरावापुरतेंच स्थान राजकारणी लोकांनीं दिलेलें होतें. आणि अण्णासाहेबांनीं हा पेहेराव बनविणाऱ्याचीच भूमिका घेतलेली होती.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अण्णासाहेबांचें सर्व कर्तृत्व, गांधी-विचाराचा दृष्टिकोन पुढें ठेवून अनेक प्रकारच्या सहकारी संघटना बनविणें, ग्रामोद्योगांची उभारणी करणें, सहकारी शेती भरभराटीस आणणें, निरनिराळ्या प्रकारच्या कार्यकर्त्यांना सल्लामसलत देणें, ह्यांतच उपयोगी पडत आहे. मुंबई सरकारनें त्यांना ग्रामोद्योगाचे सल्लागार म्हणून नियुक्त केलें आहे. ह्याच काळांत जपानांत जाऊन तेथील आर्थिक परिस्थितीचें निरीक्षण करण्याची संधि त्यांना मिळाली. जपानचें समाजशास्त्रीय पद्धतीनें सर्वांगीण निरीक्षण आण्णासाहेबांनीं फार थोड्या काळांत केलें आणि आपला ग्रामोद्योग व शेतीचा अनुभव अनेक पटींनीं वाढविला. पंचवार्षिक योजना तयार करतांना तज्ज्ञ म्हणून एका कमिटींत त्यांचा समावेश करण्यांत आल्यामुळें, हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीचा साकल्यानें आढावा घेण्याइतकें ज्ञान त्यांना मिळवितां आलें.

अलीकडील एका प्रसंगाकडे ह्या ओघांत मुद्दाम लक्ष वेधणें जरूर आहे. अण्णासाहेबांचा जन्मभर सारखा प्रवास चालू असल्यामुळें चालती रेल्वेगाडी पकडणें ही त्यांची मामुली गोष्ट झालेली आहे. गाडी पकडण्यासाठीं घाई व काळजी त्यांना माहीत नाहीं. ह्या त्यांच्या मनोवृत्तीमुळें एक मोठा अपघात त्यांच्या जीवावर ओढवला होता. प्लॅटफॉर्म व वेगांतील गाडीचा डबा ह्यांमध्यें सांपडल्यामुळें त्यांची पाठ सोलून निघाली. हा जिवावरचाच प्रसंग होता. एक कार्यकर्ते ह्या प्रसंगीं जवळ होते. ते असें सांगतात कीं, अण्णांचें सारें शरीर रक्तबंबाळ झालें असलें तरी हा पुरुष शांत व स्थिरच होता आणि अपघात कसा झाला ह्याची माहिती इतरांस शांतपणें देत होता. दुःखाचें चिन्हहि त्यांच्या शरीरावर दिसलें नाहीं !

असल्याच मनोवृत्तीमुळें राजकीय पक्षविशिष्ट मनोवृत्तींत त्यांचें मन रमूं शकत नाहीं. अधिकाराची लालसा तर अशा मनुष्याच्या मनोवृत्तींत टिकाव धरणें अशक्यच आहे. शरीराची पर्वा नाहीं, पक्षविशिष्ट राजकारण अंगीं लागत नाहीं, कुटुंबाचा पाश तर त्यांनीं केव्हांच सोडलेला आहे. अध्यात्म व धर्म ह्या क्षेत्रांतील विषयांच्या कक्षेंतील कोणत्याहि उपपत्तीनें त्यांच्या हृदयांत जागा अडविलेली नाहीं. व्यक्तिनिष्ठेबद्दल अत्यंत उदास असें त्यांचें मन आहे. अशा प्रकारचें वैलक्षण्यपूर्ण अण्णासाहेबांचें व्यक्तिमत्त्व आहे.

अण्णासाहेबांसारख्या अनेक प्रकारचे अनुभव मिळविलेल्या कार्यकर्त्यांचें हृदय सांप्रत भूदानयज्ञाच्या चळवळीनें आकर्षण करून घेतलेलें आहे व तें स्वाभाविकच आहे. गांधीमतानुयायी ह्या चळवळीवर आपलें सर्व बळ सध्यां केंद्रित करीत आहेत. ह्या चळवळीच्या सामर्थ्यावर व संघटनेवर आपलें अहिंसात्मक समाजरचनेचें ध्येय अवलंबून आहे अशी धारणा गांधीविचाराच्या कार्यकर्त्यांची आहे.

गांधीजींच्या धोरणाप्रमाणें ज्यांना हिंदुस्थानचें भावितव्य बनविण्याची उत्कंठा आहे अशा अत्यंत थोड्या, हाताच्या बोटांवर मोजतां येण्यासारख्या कार्यकर्त्यांमध्यें अण्णासाहेबांची सांप्रत गणना








करण्यांत येत आहे. आणि म्हणून त्यांच्यावरील जबाबदारी सद्यःस्थितींत अनेक पटींनीं वाढलेली आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं.

ज्या श्लोकांत अण्णासाहेबांसारख्यांचे गुण प्रतिबिंबित होऊं शकतात असा एक श्लोक येथें उद्धृत करणें उचित होईल :

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णाः
त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयन्तः ।
परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यं
निजहृदि विकसन्तः संति संतः कियन्तः ।।

पत्रव्यवहार

## श्रेष्ठ संगीतज्ञांच्या कलेचें रक्षण

'नवभारत' मासिकाच्या मे महिन्याच्या अंकांत श्री. **केसरबाई केरीकर** ह्यांच्यासंबंधीं माहिती देणारा श्री. के. वा. **भोळे** यांनीं लेख लिहिला असून, केसरबाईचें व इतर प्रथम श्रेणीचे गायक व वादक यांचें टेपवर एक तासाचें ध्वनि-मुद्रण करून त्यांच्या कलांचें रक्षण व्हावें याकरितां सरकारचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे.

Alain Danielou (शिवशरण) यांनीं 'Indian Music (A Catalogue of Records)' या नांवाचा ग्रंथ प्रथम इंग्रजी आणि त्याच्या खालीं फ्रेंच भाषेंत 'यूनेस्को' मार्फत प्रसिद्ध केला आहे. (या ग्रंथाची प्रत 'भांडारकर इन्स्टिटयूट्'मध्यें आहे.) या ग्रंथांत सर्वसाधारणपणें उत्तर व दक्षिण गायनवादन-पद्धतीची व रागांची माहिती, निरनिराळ्या प्रकारचीं तंतु व इतर वाद्यें यांचे फोटो, सुप्रसिद्ध गवई, तंतुवाद्यकार, पखवाजकार, मृदंगी वगैरेंची, रवींद्रनाथ टागोर यांच्या गाण्यांची व भजनांची, कीर्तनें, ग्रामीण जनतेची गाणीं इत्यादींची व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषें-तील किंवा समाजांतील अभिजात कलाकारांची माहिती दिली आहे. त्यांचें रेकार्ड मेगाफोन, कोलंबिया, हिंदुस्थान किंवा हिज मास्टर्स व्हॉईस ह्या कंपन्यांमार्फत मिळवून युनोच्या रेकार्ड-भांडारा-(Archives)मध्यें त्यांचा संग्रह केला आहे. त्यांची संख्या सुमारें एक हजार असून रेकॉर्डची साइज १० इंची व्यासाची आहे. वरील संग्रहांत श्री. केसरबाईंच्या सहा ध्वनिमुद्रिका असून त्या बारा इंची आहेत. फक्त दोनच ब्रॉडकास्ट असल्याचें दिसून येतें. वरील रेकार्ड-कंपन्या परदेशीय आहेत. त्यांच्यांत अशी प्रथा आहे कीं, त्या काढीत असलेल्या ध्वनिमुद्रिका कितीहि उच्च दर्जाच्या गायकांच्या किंवा वादकांच्या असल्या व त्यांतील कांहींस आम्हीं फार महत्त्व दिलें असलें, तरी जर खपाच्या बाबतींत योग्य ती मागणी नसली किंवा त्यांत अपयश आलें, तर तीन महिन्यांच्या आंत त्या लागलींच कोणत्याहि प्रकारची कदर न ठेवतां नष्ट केल्या जातात. म्हणून हिंद सरकारनें किंवा संगीत नाटक-ॲकॅडेमीनें युनेस्कोप्रमाणें नागपूर, मुंबई किंवा दिल्लीसारख्या केंद्राच्या ठिकाणीं अशा प्रकारचीं भांडारें स्थापून तेथें श्री. भोळे यांनीं लिहिल्याप्रमाणें प्रख्यात व अभिजात गायक-वादकांचें टेपवर एक तासाचें ध्वनिमुद्रण करून त्यांच्या व भूतकालांत होऊन गेलेल्या कलाकारांच्या ध्वनिमुद्रिकांचा संग्रह केल्यासच या कलांचें रक्षण होईल.

श्री. भोळे यांनीं त्याच लेखांत "कलेकरितां सर्वस्वाचा त्याग करून तिच्या साधनेंत व सेवेंत आनंद मानणें हा गोव्याच्या मातीचा गुणच होय" असें लिहिलें आहे; परंतु आमच्या गोमंतकीयांच्या या गुणाचें चीज दिवसेंदिवस कमी होत आहे. राजाश्रय नसल्यामुळें पारंपरिक रीत्या लोकाश्रयावर या कलाकारांचें संरक्षण होत होतें. कोणाचीहि इच्छा ही विद्या संपादन करावयाची असल्यास कै. वझेबुवांसारख्या योग्यतेचे गुरु येथें मिळणें सध्यां मुष्किल झालें आहे. तसेंच सध्यांच्या आर्थिक परिस्थितीमुळें किंवा नवीन चालीरीतींमुळें लग्न-समारंभ, शिमगा, काला, देवांच्या मूर्तींच्या पालखीच्या मिरवणुकी किंवा निरनिराळे उत्सव या प्रसंगीं त्यांचे कार्यक्रम केल्यामुळें, त्यांस आर्थिक साहाय्य होऊन त्यांचा चरितार्थ चालत होता, तोहि आतां होऊं शकत नाहीं. त्यामुळें या मातीचा गुण थोड्याच कालांत नाहींसा होईल, याबद्दल फार दुःख होत आहे.

पुणें.

—वामन अ. शेट खलप










नुकत्याच झालेल्या रौप्यमहोत्सवाच्या निमित्तानें कांहीं विचार : सौ. इंदिराबाई देवधर

# अखिलभारतीय महिलापरिषदेचें कार्य

" जर खरोखरच उद्यां तुळशीबागेंत पुणें शहरांतील स्त्रियांची सभा भरून, मुलींच्या विवाहाची वयोमर्यादा बारा वर्षांपर्यंत वाढवूं नये, असें स्त्रिया ठरविणार असतील, तर त्यांत मला आपला निषेध झाला, असें वाटून दुःख करण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट, असा कांहीं एक कायदा होणार आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन स्त्रिया एकत्र जमणार, आपल्या परिस्थितीचा विचार करणार व कांहीं एक निर्णय घेणार हें ऐकून मला एक प्रकारचें समाधानच वाटत आहे. इतकी जागृति स्त्रियांत झाली असेल तर आज नाहीं उद्यां त्या योग्य तोच निर्णय घेतील."

सुमारें साठ वर्षांपूर्वी न्या. महादेव गोविंद रानडे यांनीं वरील उद्गार काढले होते. बंगालमध्यें दहा वर्षें वयाच्या फुलमोनी नांवाच्या मुलीचा मृत्यु तिच्या नवऱ्यानेंच तिजवर जबरी केल्यामुळें रक्तस्राव होऊन झाला. त्यामुळें मोठी खळबळ होऊन नवऱ्याच्या बाबतींतहि मुलीच्या संमतीचें वय बारा वर्षांपर्यंत ठरवावें, अशा अर्थाचे ठराव ठिकठिकाणीं सुधारकांच्या सभा भरून पास झाले. तसेंच, संमतिवयाचा कायदा पास होणें थोडें कठीण, म्हणून मुलींचे विवाहच बारा वर्षांपर्यंत करूं नयेत, असेहि ठराव कांहीं सभांतून पास झाले. न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या पुढाकारानें पुण्यांतहि अशी एक सभा होऊन वरील ठराव मान्य झाले. त्यामुळें पुण्यांतील सनातनी मंडळी खवळून गेली व न्या. रानडे यांना फजित करण्यासाठीं म्हणून, दुसऱ्या दिवशीं त्यांच्याकडे जाऊन त्यांना सांगूं लागली : " उद्यां पुण्यांतील स्त्रिया तुळशीबागेंत एक सभा भरवून तुमचा निषेध करणार आहेत. त्यांना विवाहाची वयोमर्यादा वाढविणें बिलकुल पसंत नाहीं." त्यावर ह्या सनातनी मंडळींना उत्तर म्हणून न्या. रानडे यांनीं आरंभीं दिलेले उद्गार काढले होते.

साठ वर्षांपूर्वी मध्यम परिस्थितींतील स्त्रिया आपल्या जबाबदारीवर अशी एखादी सभा भरवूं शकतील, अशी खात्री न्या. रानडे यांनाहि वाटत नव्हती. त्याच ह्या पुण्यामध्यें पंचवीस वर्षांपूर्वी अखिलभारतीय महिलापरिषदेची स्थापना होऊन यंदां १९५३ सालीं २ मे पासून तिचा रौप्यमहोत्सवहि साजरा झाला.

ह्या साठ वर्षांच्या काळांत महिला-चळवळीचें शैशव व यौवन हे दोन कालखंड संपून, ती जबाबदार प्रौढावस्थेंत प्रवेश करतांना आतां दिसत आहे.

## पुरुषांची महिलांसाठीं चळवळ

ह्या चळवळीच्या शैशवावस्थेंत तिचें पुढारीपण अर्थात् बंधुवर्गाकडे होतें. स्त्री शिक्षण, पुनर्विवाह, बालावृद्ध-विवाह, केशवपन, संमतिवय वगैरे प्रश्न समाजांत चर्चिले जात, पण ते पुरुषांच्या नेतृत्वाखालीं. म्हणून या काळांतील चळवळ ही महिलांची चळवळ नसून, महिलांसाठीं चळवळ होती. १९०४ सालीं मुंबईस भरलेल्या ' भारत महिलापरिषदे 'च्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना, कै. रमाबाईसाहेब रानडे यांनीं उद्गार काढले आहेत कीं, " परिषदेची मीं अध्यक्ष व्हावें असा डॉ. भांडारकर व हरिभाऊ आपटे यांचा मला फार आग्रह पडला. त्याला नकार देणें मला फार कठीण झालें. त्यांनींच राष्ट्रीय सामाजिक परिषदेची स्त्री-शाखा म्हणून ही परिषद् भरविण्याचें ठरविलें." यावरून अप्रत्यक्ष रीतीनें ह्या परिषदेचें नेतृत्व पुरुषांच्याकडेच होतें, असें दिसतें. ह्या परिषदेंत विद्यागौरी रमणभाई, शारदाबेन मेहता, मिसेस तय्यबजी, मिसेस फैजी, मिसेस पेटिट, सरोजिनी नायडू व काशीबाई कानिटकर यांचीं भाषणें झाल्याचा उल्लेख ह्या परिषदेच्या अहवालांत आहे. श्री. रमाबाईंनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत विधवा, परित्यक्ता अशा स्त्रियांची सोय समाजानें केली पाहिजे असें सांगितलें. एवढेंच नव्हे तर, पुढें १९०९ सालीं ' सेवासदना 'ची स्थापना करून त्यांनीं आपल्या विचाराला मूर्त स्वरूप दिलें.

१९१८ सालीं असाच एक अखिलभारतीय स्वरूपाचा उपक्रम झाला. भारतीय महिलांचें एक








शिष्टमंडळ ना. मॉन्टेग्यूसाहेब यांच्या भेटीस गेलें होतें. त्या वेळीं त्यांनीं आपल्या मागण्यांचा खलिता ना. मॉन्टेग्यूसाहेबांस सादर केला. मिसेस टाटा, डॉ. नागूताई जोशी (राणी राजवाडे), सरलाबाई नाईक, कमलाबाई किबे, डॉ. ॲनी बेझंट, श्रीरंगम् मल्ल इत्यादि स्त्रिया ह्या शिष्टमंडळांत होत्या.

१९२७ पर्यंत अशा रीतीनें अगदीं अखिल-भारतीय स्वरूपाच्या नसल्या तरी कांहीं मागण्या करण्यासाठीं अगर अनिष्ट गोष्टींच्या निषेधासाठीं अधूनमधून स्त्रियांच्या मोठ्या जाहीर सभा होत असत; पण यासाठीं सतत कार्य करणारी स्त्रियांची एखादी संघटना नव्हती.

## महिलांकडे नेतृत्व

१९२७ सालीं अ. भा. म. परिषदेची स्थापना होऊन महिला चळवळीचा दुसरा कालखंड सुरू झाला व ह्या चळवळीचें नेतृत्व स्त्रियांनींच आपल्याकडे घेतलें. यामुळेंच कीं काय कोण जाणें, पण १९२८ पासून राष्ट्रीय सामाजिक परिषदेचें अधिवेशन भरण्याचेंहि बंद झालें.

ज्याप्रमाणें राष्ट्रीय सभेची स्थापना होण्याला सर हेन्री कॉटन, सर ए. ओ. ह्यूम अशा कांहीं उदारमतवादी इंग्रज गृहस्थांचें साहाय्य झालें, तसेंच साहाय्य, अड्यार येथें वास्तव्य करून राहिलेल्या सुप्रसिद्ध थिऑसॉफिस्ट मिसेस् मार्गारेट कझिन्स यांचें अ. भा. म. परिषदेच्या स्थापनेला झालें. पहिल्या परिषदेच्या त्याच सरचिटणीस होत्या. ह्या पहिल्या अधिवेशनास पुण्यांतील महिलांनीं निमंत्रण दिलें आणि १९२७ जानेवारीच्या ५-६-७ तारखांस बडोद्याच्या महाराणी चिमणाबाईसाहेब गायकवाड यांच्या अध्यक्षतेखालीं तें यशस्वी रीतीनें पार पडलें.

शिक्षणाच्या बाबतींत आपली एकमुखी मागणी काय आहे, ती सरकारपुढें प्रामुख्यानें मांडण्यासाठीं ही पहिली परिषद् भरली होती. त्यामुळें परिषदेंतील सर्व ठराव, सरकार, लोकल बोर्ड, म्युनिसिपालिट्या यांना विनंति करणारेच होते. ह्या मागण्या मान्य होईपर्यंत सतत प्रयत्न करण्यासाठीं, ह्याच परिषदेंत एक कार्यकारी समिति निवडण्यांत आली व घटना व नियम तयार झाले. दर वर्षी अधिवेशन भरविण्याचें ठरलें.

दोन-तीन अधिवेशनांनंतर, आपल्या प्रगतीच्या मार्गांत आड येणाऱ्या अनिष्ट अशा सामाजिक रूढी व चालीरीती यांचाहि विचार परिषदेंत होऊं लागला.

ह्यापुढच्या काळांत कामगार-स्त्रिया, खाणींत काम करणाऱ्या स्त्रिया, यांचे प्रश्न परिषदेंत चर्चेस येऊं लागले आणि या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या स्त्रिया परिषदेच्या कामकाजांत भाग घेऊं लागल्या.

याहिपुढची मजल म्हणजे राजकीय प्रश्नाबाबत परिषदेनें मत प्रदर्शित करावें, मात्र राजकीय चळवळींत प्रत्यक्ष भाग घेऊं नये अशी विचारसरणी संमत झाली.

## महिलापरिषदेचें कार्य

पंचवीस वर्षांत परिषदेच्या ध्येयधोरणाचा विस्तार वरीलप्रमाणें झाला. ह्या काळांत परिषदेच्या हातून झालेलें विधायक कार्यहि नमूद करण्यासारखें आहे. ३५ हजार सभासद-संख्या, ४९ प्रांतिक व संस्थानांतील मिळून मुख्य शाखा, व ३०० उपशाखा हें तिचें आजचें संख्याबळ आहे. यांतील १०० उपशाखा फक्त महाराष्ट्रांतील आहेत. परिषदेनें केलेलीं कामें अशीं :

(१) १९४६ पासून खेडोंपाडीं जाऊन आरोग्य-मदत देणाऱ्या चार औषधी गाड्या चालू केल्या. या प्रत्येक गाडीचा दरमहाचा खर्च ६०० पासून १०००-१२०० रुपयांपर्यंत आहे.

(२) तीस हजार रुपये बिहारफंड जमविला.

(३) स्त्रियांच्या हक्कांचा जाहिरनामा तयार केला.

(४) आग्रामा येथें कार्यकर्त्यांसाठीं शिबिर चालविलें.

(५) हिंदु कोड, नागरिकहक्क, मताधिकार, अन्न व दूध, खाणीकामगार स्त्रिया वगैरेसारख्या अनेक विषयांवर छोटीं सुबोध पुस्तकें लिहून, तीं भारतांतील प्रमुख भाषांतून प्रसिद्ध केलीं.

(६) हिंदी व इंग्रजीमधून 'रोशनी' नांवाचें बुलेटिन काढण्यांत येतें.








( ७ ) बंगालच्या दुष्काळाच्या वेळीं लाखों रुपये जमवून बालसंरक्षणगृहें चालू केलीं.

( ८ ) परिषदेच्या सतत मागणीमुळेंच हिंदु कोड तयार करण्यासाठीं सरकारनें राव कमिटी नेमली.

( ९ ) इंग्लंडमध्यें जाऊन परिषदेच्या प्रतिनिधींनीं लोथियन कमिटीपुढें साक्ष दिली.

( १० ) अष्टी व चिमूर प्रकरणांची व बिहारमधील कोळशाच्या खाणींत काम करणाऱ्या स्त्रियांची चौकशी करून अहवाल तयार केला.

( ११ ) दिल्ली येथें 'लेडी आयर्विन कॉलेज' गेलीं वीस वर्षें चालविलें आहे.

( १२ ) १९५३ च्या मार्चमध्यें बचत-योजना-सप्ताह सर्व हिंदुस्थानभर साजरा करून, पन्नास लाख रुपये जमवून दिले.

हीं सर्व ठळक कामें परिषदेकडून झालीं. शिवाय तिच्या शाखोपशाखांतून साक्षरताप्रसार, कुटुंब-नियोजन-केंद्रें, सहकारी भांडारें, प्रदर्शनें, दूधकेंद्रें, वाचनालयें, प्रांतिक, जिल्हा व तालुका परिषदा इत्यादि कार्यें नेहमींच चालू आहेत. गेलीं पंचवीस वर्षें अशा तऱ्हेनें लहान मोठीं कार्यें आपल्या जबाबदारीवर करीत राहिल्यामुळें, अनेक कार्यकर्त्या स्त्रिया निर्माण झाल्या आहेत. त्याचें श्रेय परिषदेलाच आहे, यांत शंका नाहीं.

परिषदेची वार्षिक वर्गणी कमींत कमी चार आणे आहे. परिषद् कुठल्याहि पक्षाची अगर जातीची संघटना नाहीं. स्त्रिया व मुलें यांची सर्वांगीण उन्नति करणें, हें तिचें ध्येय आहे.

परिषदेनें स्त्रियांची सर्वांगीण उन्नति हें ध्येय ठेवूनहि, स्त्रियांसाठीं राखीव जागांची मागणी कधींहि केलेली नाहीं; आणि ह्या तिच्या धोरणाबद्दल लोदियन कमिटीच्या रिपोर्टांत "केवळ आपल्या देशाचें हित डोळ्यांपुढें ठेवून ह्या परिषदेच्या प्रतिनिधींनीं साक्ष दिली" असा गौरवपूर्वक उल्लेख करण्यांत आला आहे. आज सर्व भारतीय महिलांची अशी ही एकच मोठी संघटना असून, युनोनें आपल्या कामकाजांत सल्लागाराचा दर्जा तिला दिला आहे.

परिषदेच्या पंचवीस वर्षांतील कार्याचा हा थोडक्यांत आढावा आहे. परिषदेच्या आजवर ज्या मागण्या होत्या, त्या बहुतेक पदरांत पडल्या आहेत. भारताच्या घटनेनें स्त्रीपुरुषांचे समान हक्क मान्य केल्यामुळें, महिला चळवळीचा दुसरा कालखंड संपून, आतां ती तिसऱ्या कालखंडांत प्रवेश करीत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पहिल्या कालखंडांत बहुशः बंधुवर्गाच्या मदतीनें 'महिलांसाठीं चळवळ' चालू होती. दुसऱ्या कालखंडांत ( म्हणजेच अ. भा. म. परिषदेच्या स्थापनेपासून ) 'महिलांसाठींच महिलांची चळवळ' होती. आणि आतां तिसऱ्या कालखंडांत 'देशासाठीं महिलांची चळवळ' असें तिचें स्वरूप राहील, निदान राहावयास हवें.

आतां यापुढें महिलांची चळवळ म्हणण्यापेक्षां 'महिलांचें कार्य' हा शब्दप्रयोग अधिक योग्य होईल. कारण चळवळ म्हणजे ती कोणाच्या तरी विरोधी असते व तसें स्वरूप या परिषदेच्या कार्याला आतां राहिलेलें नाहीं. ह्या बदलत्या कालखंडाचें हें स्वरूप रौप्यमहोत्सवाच्या वेळीं भरलेल्या ह्या अधिवेशनांत बारकाईनें पाहाणारास दिसलेंहि असेल.

### गेलें रौप्यमहोत्सवी अधिवेशन

अगदीं स्थूलमानानें अधिवेशनाकडे पाहणाऱ्यासहि एकंदर परिषदेचा कार्यक्रम उद्बोधक वाटला. प्रदर्शन, करमणुकीचे कार्यक्रम, स्त्रियांची रायफल व साधी कवाईत, खेळ इत्यादि कार्यक्रमांसाठीं दर वेळीं दोन हजारांपेक्षां अधिक समाज उपस्थित होता. या सर्व कार्यक्रमांतून दिसणारें महाराष्ट्रीयांचें वैशिष्ट्य परप्रांतीयांना उल्लेखनीय वाटलें. करमणुकीचा कार्यक्रम, कवाईत, खेळ या सर्वांत साठ वर्षांपर्यंतच्या महिलांनींहि भाग घेतला होता.

अध्यक्ष, स्वागताध्यक्ष यांचीं व निमंत्रितांचीं भाषणें हें सर्व नेहमींच्या रिवाजाप्रमाणेंच होतें. सात-आठ हजार प्रेक्षकसमुदायाच्या उपस्थितीमुळें, परिषदेची सुरुवात रौप्यमहोत्सवाला साजेशा भव्य व गंभीर वातावरणांत झाली. पंडित नेहरू आदींचे शुभसंदेश आले होते, तर अमेरिकेच्या मिसेस हर्से, इंग्लंडच्या लेडी हर्टींग, पाकिस्तानच्या मिसेस फैझी, यांनीं आपापल्या देशाचे संदेश स्वतःच सांगितले.








डॉ. रघुनाथराव परांजपे व मामासाहेब देवगिरीकर यांचींहि भाषणें झालीं. आणि पहिल्या दिवसाचा कार्यक्रम संपला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सौ. दुर्गाबाई देशमुख यांचें पंचवार्षिक योजनेवर सुमारें दोन तास भाषण झालें. पंचवार्षिक योजनेला अ. भा. म. परिषदेनें कसा हातभार लावावा तें त्यांनीं सांगितलें. यानंतर सर्व शाखांचें अहवालवाचन झालें. मुख्य चाळीस शाखांचे अहवाल वाचण्यांत कमींत कमी तीन तास वेळ गेला. यापेक्षां या सर्व अहवालांची छापील प्रत प्रतिनिधींना देण्यांत यावी. सर्वांच्या कार्यांचा उल्लेख असलेला मुख्य अहवाल पहिल्या दिवशींच वाचला गेलेला असतोच. तेव्हां आणखी तीन तास वेळ त्याकरितां देऊं नये. शिवाय प्रेक्षकांच्या दृष्टीनेंहि हा कार्यक्रम फार कंटाळवाणा ठरतो.

सर्व शाखांकडून ठराव मागवून, त्यांतून विषयनियामक कमिटीनें कांहीं ठराव नक्की करावयाचे या नेहमींच्या पद्धतींत यंदां थोडा बदल केला गेला. परिषदेपूर्वीं चर्चेचे विषय सर्व शाखांना कळविण्यांत आले होते. प्रथम फक्त प्रतिनिधींचीच सभा होऊन त्यांवर चर्चा करण्यांत आली.

पंचवार्षिक योजना आणि परिषदेचें ध्येय, धोरण व पुढील कार्य—हे दोन विषय निवडले होते. दोन्ही प्रश्नांवर एकाच वेळीं पण निरनिराळ्या ठिकाणीं चर्चा चालू होती. त्यामुळें प्रतिनिधींना आपल्या आवडीनिवडीप्रमाणें, पण एकाच ठिकाणीं हजर राहतां आलें. एका चर्चा-सभेच्या अध्यक्ष लेडी रामराव व दुसरीच्या हॅना सेन होत्या. कांहीं प्रतिनिधींनीं थोडा वेळ एका ठिकाणीं व थोडा वेळ दुसऱ्या ठिकाणीं हजर राहून, दोन्हीहि विषयांबद्दलची आपली आवड दर्शविली. पंचवार्षिक योजनेवरील चर्चा चांगलीच रंगली. अनेक प्रतिनिधींनीं त्यांत भाग घेतला. इंग्रजी, हिंदी, मराठी या तिन्ही भाषा राबविल्या गेल्या. लोकशिक्षण, सहकारी सोसायट्या वगैरेंत कामें करणाऱ्या स्त्रिया उपस्थित असल्यामुळें चर्चा उद्बोधक झाली. दुसऱ्या विभागांतील चर्चा मात्र तेवढी रंगली नाहीं. कारण चर्चेचा विषय अपेक्षेइतका व्यापक नव्हता. पुढील वर्षीत हिंदुकोड बिल, दुष्काळ, गुन्हेगार मुलें यांबाबत शाखांनीं काय काम करावें, कसें करावें यांबद्दलचे ठराव होते व त्या अनुरोधानें चर्चा झाली. अध्यक्ष रेणुका रे यांनीं निर्वासितांच्या प्रश्नाबद्दल काय काम करतां येईल हें सांगितलें. त्या स्वतःच या खात्याच्या मंत्री असल्यामुळें ह्या चर्चेच्या वेळीं त्या उपस्थित होत्या. ह्या दोन्ही प्रश्नांवरील झालेल्या चर्चेंत सर्वसंमत मुद्दे लक्षांत घेऊन, दोन्ही सभांचे दोन वेगवेगळे अहवाल तयार करण्यांत आले व खुल्या अधिवेशनांत वेगवेगळे ठराव असे न मांडतां, हे अहवालच सभेपुढें ठेवून त्यांस मान्यता घेण्यांत आली.

अनुकूल-प्रतिकूल भाषणें ऐकल्यानें प्रेक्षकांनाहि एक प्रकारचा तत्त्वबोध होतो. पण खुल्या अधिवेशनांत तसें कांहीं ऐकावयास मिळालें नाहीं. आणि प्रतिनिधींनाहि, पूर्वींच सर्व चर्चा ऐकलेली असल्यामुळें, खुल्या अधिवेशनाच्या वेळीं फारसें औत्सुक्य राहिलें नव्हतें. एकंदरींत ही पद्धत प्रेक्षकांच्या दृष्टीनें नसली तरी, सर्वांगीण चर्चेच्या दृष्टीनें चांगली वाटली. चर्चा-सभेंत अधिक मोकळेपणानें प्रतिनिधी प्रश्न विचारतात असें दिसलें. मात्र, एकाच वेळीं दोन्ही ठिकाणीं हजर राहतां आलें नाहीं ही एक गैरसोय झाली, अशी कांहीं प्रतिनिधींची तक्रार ऐकूं येत होती.

परिषदेंतील आणखी उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे परिषदेच्या एक संस्थापक, पहिल्या सरचिटणीस व अहमदाबाद येथील अधिवेशनाच्या अध्यक्ष **मिसेस मार्गारेट कझिन्स** यांना दरमहा २०० रुपये देण्यासाठीं पांच हजारांचा निधि जमविण्याचें ठरलें. श्री. हॅना सेन व लेडी रामराव यांनीं विनंति करतांच त्यांपैकीं दोन हजार रुपये तेथल्या तेथेंच जमले. मिसेस मार्गारेट कझिन्स व त्यांचे पति डॉ. कझिन्स हे दोघे थिऑसॉफिस्ट असून, अड्यार येथें त्यांचें आज कित्येक वर्षें वास्तव्य आहे. मिसेस कझिन्स यांचें वय ८२ वर्षांचें आहे व त्या अर्धांगवायूनें अंथरुणावर आहेत. त्यांचे पति डॉ. कझिन्स हेहि वृद्धापकालानें अतिशय थकले आहेत आणि मिसेस कझिन्स यांची सेवाशुश्रूषा करणें त्यांना कठीण होत चाललें

# अखिलभारतीय महिलापरिषदेचें कार्य

आहे. तेव्हां परिषदेनें घेतलेला हा निर्णय अत्यंत योग्यच समजला जाईल.

भूदान-चळवळीला पाठिंबा, सर्व देशभर संपूर्ण दारूबंदीची मागणी, खादीचा पुरस्कार, आरोग्य-प्रश्नावरील चर्चेंत कुष्ठरोग व कॅन्सर यांच्या संशोधनावर भर देण्याबद्दल विनंति, महिलांच्या हितासाठीं स्वतंत्र खातें उघडण्याची मागणी वगैरे ठराव वरील दोन्ही चर्चा-सभांच्या अहवालांतच नमूद केले होते. प्रत्येक ठरावास निरनिराळे सूचक-अनुमोदक नव्हते.

## महिलापरिषदेसारख्या संस्थेची गरज

परिषदेंत झालेल्या कामकाजाबद्दल लिहिलें. आतां त्याबद्दल प्रेक्षकांत व इतरत्र जी कांहीं चर्चा ऐकूं आली ती पाहतां परिषदेच्या कार्याविषयीं कांहीं प्रश्न उत्पन्न होतात. त्यांचा संक्षेपानें परामर्श घेणें इष्ट होईल.

मद्रासचे पंतप्रधान श्री. राजगोपालाचारी यांनीं आपल्या शुभसंदेशांत स्त्रियांनीं पुरुषांच्या पाठिंब्यावर ( शुभ संदेशावरसुद्धां ) अवलंबून राहूं नये, असें म्हटलें होतें. निमंत्रित वक्ते म्हणून पहिल्या-दिवशींच्या खुल्या अधिवेशनांत बोलतांना श्री. मामासाहेब देवगिरीकर म्हणाले, " आतां यापुढें परिषदेनें केवळ महिलांचेंच काम न करतां आपलें सर्वांचें जें कार्य आहे तें करावें." आतां स्वतंत्र महिलासंघटनेची आवश्यकताच नाहीं असें म्हणणाऱ्या कांहीं भगिनी परिषदेंत पास झालेल्या ठरावांचा निर्देश करून म्हणाल्या " हैद्राबाद-कॉंग्रेसच्या अधिवेशनांत व पुण्यास नुकत्याच भरलेल्या ' महाराष्ट्र-सामाजिक-परिषदें 'त व आजच्या महिला-परिषदेंत झालेले ठराव पाहिले, तर त्यांत फार फरक नाहीं. विषय तर तेच आहेत. मग ही निराळी परिषद् कशाला ? "

वरील प्रश्न केवळ आजच विचारले जात आहेत असें नाहीं. पन्नास वर्षांपूर्वींहि हेच विचारले जात होते. १९०४ सालीं मुंबईस भरलेल्या ' भारत-महिलापरिषदे 'चा अहवाल त्या परिषदेच्या सेक्रेटरी श्री. काशीताई कानिटकर यांनीं लिहिलेला आहे. त्यांतहि त्यांनीं भारत-महिलापरिषदेवर असेच आक्षेप घेतले जातात असें म्हटलें आहे.

भारताच्या घटनेंत स्त्री-पुरुषांना समान हक्क, समान संधि, समान अधिकार दिले असले तरी ते कागदावरच आहेत. ते प्रत्यक्षांत येण्यासाठीं जसा स्त्री-शिक्षणाचा प्रसार अधिक झाला पाहिजे तसा समाजकार्यासाठीं अवश्य असणाऱ्या इतरहि अनेक गुणांचा विकास स्त्रियांमध्यें झाला पाहिजे. गेल्या पंचवीस वर्षांत ह्या दृष्टीनें अ. भा. म. परिषदेच्या शाखोपशाखांनीं खरोखर चांगली कामगिरी बजावली आहे. तिच्या लहान गांवांतून असलेल्या शाखांकडून फार मोठेसें कार्य झालें नाहीं, तरी छोटीं छोटीं कामें कां होईनात, तीं स्वतःच्या जबाबदारीवर करण्याची स्त्रियांना संवय होते. घटना, नियम, निवडणूक, मतदान, पदाधिकारी वगैरे गोष्टींची माहिती होते. त्यामुळें ह्या शाखा म्हणजे स्त्रियांना सार्वजनिक कार्याचें प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळाच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

परिषदेच्या सुरुवातीला स्त्रियांच्या ज्या मागण्या होत्या त्या बहुतेक आतां मान्य झाल्या आहेत हें खरें. पण परिस्थितीनुसार कांहीं नवीन मागण्या निर्माणहि होत असतात. जोंपर्यंत स्त्री-पुरुष हा भेद निसर्गानेंच केला आहे, तोंपर्यंत केवळ स्त्रियांचे असे प्रश्न राहणारच. शिवाय स्त्रियांत काम करण्यासाठीं, स्त्रियांच्याच संस्था, समित्या असल्यास तें काम अधिक सुलभ होतें अशी आजची वस्तुस्थिति आहे. कॉंग्रेस, हिंदुमहासभा वगैरे राजकीय पक्षांचे स्त्री-पुरुष सभासद असतात. मग त्या त्या पक्षाच्या स्वतंत्र स्त्री-शाखा कशासाठीं ? दोन वर्षांपूर्वीं ' कॉंग्रेस स्त्री-संघटना-समिती 'चें विसर्जन झाल्याचें जाहीर झालें होतें. आतां पुन्हां तिचें पुनरुज्जीवन करण्यांत आल्याचें समजतें. तेव्हां अशा वेगवेगळ्या राजकीय पक्षांच्या, धर्मांच्या, जातींच्या, संस्थांच्या जोंपर्यंत स्त्री-शाखा अस्तित्वांत आहेत, तोंपर्यंत सर्व स्त्रियांच्या वतीनें बोलणारी पक्षातीत अशी अ. भा. महिलापरिषदेसारखी संघटना आवश्यकच आहे.

पाश्चात्य देशांत स्त्री-पुरुषसमानता आज कित्येक



अनुक्रमणिका






वर्षे मान्य झालेली आहे. असें असून तेथेंहि अधून-मधून जागतिक स्वरूपाच्या महिलापरिषदा भरविण्यांत येत असतात. याचें कारण हेंच कीं, महिला-चळवळीचें अंतिम ध्येय फार विशाल आहे. स्त्रियांची चळवळ ही न्याय्य हक्कांकरितां भांडणाऱ्या दुर्बलांची चळवळ आहे. आक्रमणशीलता व शिरजोरपणा हा तिचा धर्म नाहीं. अखिलभारतीय महिलांचीच काय, जगांतील सर्व स्त्रियांची एक प्रभावी संघटना असणें जरूर आहे. राष्ट्राराष्ट्रांमध्यें चालू असलेल्या सत्तास्पर्धेमुळें, जागतिक शांतता धोक्यांत आली आहे. अशा वेळीं सदैव शांततेचा पुरस्कार करून, न्याय व माणुसकीच्या बाजूलाच स्त्रिया आपलें वजन टाकतील तर महिलांची चळवळ ही मातांची चळवळ ठरेल आणि हेंच महिलाचळवळीचें उदात्त स्वरूप होय. भारतांतील महिला-चळवळीच्या या तिसऱ्या कालखंडांत, अ. भा. म. परिषदेचें स्वरूप भारताच्या कन्या व सुपुत्र यांच्या कल्याणासाठीं झटणारी अ. भा. मातांची परिषद् असेंच राहील.

### सगुण स्वरूपाची आवश्यकता

आतां यापुढील काळांत अखिलभारतीय परिषदेनेंहि यदृच्छया होईल तसें आणि होईल तेवढें काम करण्याचें धोरण न ठेवतां परिषदेनें करावयाच्या कार्याची एक पंचवार्षिक योजना आंखावी. आज तिच्या पुष्कळशा शाखांतून जमेल तें व सुचेल तें काम करण्याचें धोरण ठेवल्यानें, 'एक ना धड, भाराभर चिंध्या' अशी कार्याची स्थिति होते. तेव्हां परिषदेनेंच एक पांच वर्षांची योजना तयार केल्यास सर्व ठिकाणच्या कार्यांत एकसूत्रीपणा येईल.

तसेंच, ह्या रौप्यमहोत्सवाच्या निमित्तानें परिषदेनें दिल्ली अगर मुंबई येथें मध्यवर्ती कचेरीसाठीं एक भव्य आणि सुंदर अशी इमारत बांधण्याची योजना आंखावी. सामान्य जनांना परमेश्वराचें सगुण स्वरूप समजतें, निर्गुण रूप समजत नाहीं. तसेंच कार्याचेंहि आहे. इमारतीची सगुण मूर्ति डोळ्यांपुढें असल्यावर तिचें कार्य चटकन् दिसतें, स्मरणांत राहतें! ह्याला लागणारा निधि सर्व प्रांतांतून जमवावा. ज्या प्रांताच्या शाखेकडून निदान दहा हजार रुपये तरी येतील, त्या शाखेचें नांव (उदाहरणार्थ, बंगाल, महाराष्ट्र, गुजरात असें) एकेका खोलीला द्यावें. अधिक निधि जमवून दिल्यास मोठ्या हॉलला नांव द्यावें. असें केल्यानें प्रत्येक प्रांताला निधि जमविण्यास उत्तेजन मिळेल. नंतर त्या त्या प्रांताच्या खोलींत प्रांतांतील कार्य दाखविणारा नकाशा, ऐतिहासिक स्त्रिया व आधुनिक कालांतील थोर स्त्रिया यांचीं छायाचित्रें, स्त्रियांचें वाङ्मय व इतर कलाकृती यांचा संग्रह असावा. यायोगें सर्व भारतांतील स्त्रियांचें कार्य व प्रगति एकत्र पाहतां येईल. परिषदेलाहि स्वतःची इमारत लाभून, अनेक तऱ्हेचीं कायम स्वरूपाचीं कामें हातीं घेतां येतील. आज परिषदेच्या ४९ मुख्य शाखा आहेत. सर्वांनीं मनावर घेतल्यास ह्या इमारतींत एकूणपन्नास लहान मोठ्या खोल्या होतील. सर्व खात्यांच्या कचेऱ्या, ग्रंथालय, संग्रहालय, स्वतःचा छापखाना, पाहुण्यांसाठीं व कार्यकर्त्यांसाठीं तेथेंच राहण्यास जागा यांची उत्तम सोय होईल व सर्व प्रांतांच्या नांवांचा समावेश असलेलें **अखिलभारतीय महिला-मंदिर** तयार होईल.

---

## जीवन

आकाशाच्या महासागरांत
सूर्याच्या दीपगृहाच्या आधारानं
पृथ्वीची विशाल नौका चालली होती.
आणि चंद्राच्या नायकत्वाखालीं
असंख्य पाणबुड्या
सागराच्या जलपृष्ठावर हेलकावे खात
आपलं चंदेरी सौंदर्य उधळीत
नौकेचा पाठलाग करीत होत्या.
त्या नौकेवर
सुंदर जलतुषार उडत.
त्यांचंच नाव जीवन !

**—सुरेश डोळके**







श्री. मा. प. मंगुडकर

# परद्वीपस्थ भारतीय

परद्वीपस्थ भारतीयांचा प्रश्न हिंदुस्थानच्या दृष्टीनें जसा गंभीर बनत चालला आहे तसाच तो जगाच्या दृष्टीनें गुंतागुंतीचा होत चालला आहे. सुमारें ४०-५० लक्ष भारतीय रहिवाशी जवळ जवळ एक शतकापूर्वीपासून विविध देशांत स्थायिक झालेले आहेत. दक्षिण आफ्रिका, पूर्व आफ्रिका, सिलोन, ब्रह्मदेश, फिजी, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड, मलाया इत्यादि देशांतून पसरलेल्या हिंदवासीयांना नागरिकत्वाबद्दल कायदेशीर अडचणी जाणवूं लागल्या आहेत. त्या राष्ट्रांतील जाचक कायदे असह्य झाले, तर पुन्हां मायभूमीला परत येणें एवढेंच त्यांना शक्य आहे. एवढा प्रचंड लोंढा आज जर पुन्हां या देशांत आला तर अन्न, वस्त्र, घरदार आणि शिक्षण या प्राथमिक गरजांना देखील महाग झालेल्या या देशाचे हाल द्विगुणित झाल्यावांचून राहणार नाहींत. या नव्या संख्येमुळें दारिद्र्य आणि बेकारी यांना या देशांत जणूं कधीं नव्हे असें भरतें येणार आहे. भारताप्रमाणें जगाच्या दृष्टीनें देखील हा प्रश्न फार गुंतागुंतीचा आहे. म्हणूनच या प्रश्नाचा आजच सर्वांनी गंभीरपणें विचार केला पाहिजे.

एकोणिसाव्या शतकांतली औद्योगिक क्रांति इंग्रजांमुळें हिंदुस्थानांत आली व तिनें येथील दोन-अडीच हजार वर्षें टिकून राहिलेल्या जुन्या ग्रामीण अर्थव्यवस्थेस जोराचे धक्के दिले. मोडकळीस आलेल्या आमच्या खेड्यांतील अर्थव्यवस्थेमुळें हजारों कारागीर आणि लाखों मजूर बेकार बनले. जुनी अर्थव्यवस्था नष्टप्राय झाली; परंतु नवी यंत्राधिष्ठित अर्थव्यवस्था तिच्या जागीं लवकर आली नाहीं. मधल्या या संधिकालांत हजारों कुटुंबें निराधार झालीं नसलीं तरच आश्चर्य! त्यांतच पुन्हां १७७०, १७८४, १८०४, १८३७, १८६१ मधील दुष्काळानें उत्तरेंत कहर माजविला आणि १८७७, १८७८, १८८९, १८९२, १८९७ मधील दुष्काळांनीं दक्षिणेंत जीवन अन्नपाण्याविना असह्य करून टाकलें. बेकारी आणि दारिद्र्य यांच्या घरीं दुष्काळाचा आलेला नवा पाहुणा! त्यामुळें केवळ जगण्यासाठीं लाखों हिंदी मजुरांना परदेशगमनाचा मार्ग स्वीकारावा लागला. त्यांतच पुन्हां दक्षिण आफ्रिका, सिलोन इत्यादि देशांत ऊंस, चहा यांच्या लागवडीला मजुरांची गरज भासूं लागली. त्यामुळें एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत लाखों मजुरांचा प्रवाह परदेशाकडे सुरू झाला. प्राचीन काळीं भारतीय लोक इंडोनेशिया, इंडोचायना, मलाया, ब्रह्मदेश इत्यादि देशांत स्थायिक झालेले होते. जावा, सुमात्रा, बाली इकडे देखील कांहीं हिंदी लोक कायमचे रहिवाशी झाले होते. परंतु प्राचीन काळीं गेलेले भारतवासी येथील समृद्ध संस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून तिकडे गेले होते. जातांना त्यांनीं येथून उच्च संस्कृति त्या देशांत नेली होती. त्या काळचें निर्गमन येथील संपन्नतेचें आणि विजिगीषु प्रवृत्तीचें बाह्य लक्षण होतें! आज परद्वीपस्थ झालेल्या हिंदी लोकांनीं तेथें जातांना स्वतःबरोबर येथील अमर्याद गरीबी, अपरंपार बेकारी आणि अवनत संस्कृति नेली होती. आजचें आमचें परदेशगमन म्हणजे देशांत मावत नसलेल्या बेकारी आणि गरीबीचें चिन्ह होय!

## सिलोनमधील भारतवासी

हिंदुस्थान आणि सिलोन यांचे मैत्रीचे संबंध अभंग राहणें अनेक कारणांमुळें आवश्यक आहे. दोन्ही देश एकमेकांचे कायमचे शेजारी आहेत. एकाच 'राष्ट्रकुटुंबा' (कॉमनवेल्थ)चे ते घटक आहेत. दोन्ही राज्यांची प्राचीन संस्कृति पुष्कळ अंशीं एकच आहे.

इ. स. १८५२ सालीं प्रथम मद्रास व तेलंगण या भागांतून कांहीं हिंदी मजुरांची तुकडी सिलोनमध्यें रबर व चहाच्या मळ्यांत काम करण्यासाठीं गेली. तेव्हांपासून हा प्रवाह अखंडपणें १९५० पर्यंत चालू होता. प्रथम मजूर तिकडे गेल्यानंतर गुजरातेंतील व मुंबई येथील गुजराती, मुसलमान व्यापारीहि तिकडे जाऊं लागले. नंतर कांहीं डॉक्टर, वकील, एंजीनिअर्स यांनीं देखील तें







आपलें कायमचें निवासस्थान केलें. ही संख्या वाढत वाढत तेथील एकूण लोकसंख्येच्या शें. १६ टक्के पर्यंत वाढली. कायद्याच्या अडचणी निर्माण केल्यामुळें आज ही संख्या कमी झाली आहे. तरी देखील सिलोनमधील एकूण ८१,०३,६४८ लोकसंख्येमध्यें हिंदी लोकांचा भरणा जवळ जवळ १० लाखांपर्यंत आहे.

इ. स. १९२० सालीं सिलोनच्या वरिष्ठ कायदेमंडळांत प्रथम महत्त्वाचे बदल झाले. त्या वेळीं हिंदी लोकांना एक वर्षाच्या वास्तव्यानंतर मतदानाचा हक्क मिळे. इ. स. १९२३ सालीं तर सहा महिन्यांनंतर हा हक्क प्राप्त झाला. शिवाय त्यांना त्या वेळीं ३४ सभासदांमध्यें दोन जागा जातीय तत्त्वानुसार राखून ठेवल्या होत्या. तेव्हां-पासून इ. स. १९२८, १९३१, १९३८, १९४५ व १९४८ या वर्षीं कायद्यांत बदल होत होत आतां हिंदी लोकांना मतदानाचा हक्क, नागरिकत्व, कायदेमंडळांत प्रतिनिधित्व या गोष्टी नाकारण्यांत आल्या असून, त्या देशांत राहण्यास नवी परवानगी देखील नाकारण्यांत आली आहे. सिलोन सरकारचे हिंदी लोकांवरील आजचे निर्बंध गेल्या ३२–३३ वर्षांमध्यें चढत्या श्रेणीनें वाढत आलेले आहेत.

इ. स. १९२० सालीं सिलोनच्या वरिष्ठ कायदेमंडळांत एकूण ३८ सभासद असत. त्यांमध्यें जातीय तत्त्वावर फक्त एका हिंदी सभासदास स्थान मिळालें. इ. स. १९२३ सालीं ३७ बिन-सरकारी सभासद या मंडळांत आले. त्यांपैकीं अवघ्या २ जागा हिंदी लोकांना जातीय मतदारसंघांतून मिळाल्या. या त्यांच्या कायद्यांत मतदानाच्या अटी बऱ्याच सैल करण्यांत आल्या होत्या. मतदारांची संख्या वाढविण्यांत आली होती. परंतु हिंदी लोकांसाठीं राखीव २ जागा असल्यामुळें, सिलोनी लोकांना हिंदी मतदारांचें भय वाटत नव्हतें. त्यांतून इ. स. १९२३ च्या कायद्याप्रमाणें इंग्रजी आणि तामीळ भाषा येणाऱ्या लोकांनाच फक्त मतदानाचा अधिकार दिल्यामुळें गुजराती, मुसलमान, खोजा इत्यादि वजनदार व्यापारी वगळले गेले होते.

इ. स. १९२८ सालीं त्यांच्या घटनेंत दुसरा महत्त्वाचा बदल झाला. त्या वेळीं वयांत आलेल्या प्रत्येक इसमास मतदानाचा अधिकार मिळावा म्हणून त्यांनीं तजवीज केली. त्यांच्या मतदारांची संख्या त्यापूर्वीं २,०४,९९७ होती. ती आस्ते आस्ते त्यांना १२ लाखांपर्यंत न्यावयाची होती. परंतु या वेळीं तेथील वास्तव्याची मुदत ६ महिन्यां-हून पांच वर्षांवर नेली व हिंदी लोकांचें जातीय प्रतिनिधित्व काढून घेण्यांत आलें. हें जातीय तत्त्व काढण्याचें कारण नव्या कायद्यानें सर्वच हिंदी लोकांना मतदानाचा अधिकार मिळाला होता. शिवाय, २ प्रतिनिधी त्यांच्या मळ्यांतील मजुरांचें हितरक्षण कितपत करूं शकले असते हाहि वादग्रस्त मुद्दा होता.

इ. स. १९३१ च्या त्यांच्या वरिष्ठ कायदे-मंडळा-( Order-in-Council ) नें मतदारां-साठीं नव्या अटी लादल्या. त्या मुख्यतः हिंदी नाग-रिकांना मतदारांच्या याद्यांतून वगळण्याच्याच हेतूनें प्रेरित होऊन. या कायद्याप्रमाणें ( अ ) ६०० रु. दरसाल उत्पन्न असणारा किंवा १५००० रु. किंमतीची स्थावर असणारा व त्या जागेचें २०० ते ४०० रु. दर वर्षीं भाडें येणारा घरमालक, ( ब ) सिलोनचा नागरिक आहे असें मान्य करणारा व ( क ) सिलोनचा कायम रहिवासी म्हणून सर्टिफिकेट मिळविणारा——यांना मतदानाचा हक्क मिळाला. सिलोनमध्यें मुख्यतः चहा व रबराच्या मळ्यांत काम करणारे हिंदी मजूरच मोठ्या प्रमाणांत आहेत. त्यांना वरील संपत्तीच्या अटी पुऱ्या करणें अशक्य होतें. या कायद्यानें शें. ७५ हिंदी मजुरांना मतदानाचा अधिकार नाकारण्यांत आला.

वरील कायद्याप्रमाणें मतदानाच्या हक्कासाठीं हिंदी मजुरांनीं नोंद करणें जरूर होतें. हा नोंदीचा प्रकार सुशिक्षितांना देखील बुचकळ्यांत पाडणारा होता. मग हिंदी अशिक्षित मजुरांची गोष्ट विचा-रायलाच नको ! इ. स. १९३७ च्या एका सरकारी रिपोर्टांतच याबद्दल म्हटलें आहे कीं, ४१ टक्के हिंदी पुरुष व ४२·५ टक्के हिंदी स्त्रिया नांवें नोंद-विण्यासाठीं आल्या नाहींत. आलेल्या हिंदी स्त्री-पुरुषांमध्यें अनुक्रमें ५२ टक्के व ४२ टक्के लोकांची










नोंद झाली. प्रवास, औदासीन्य, अज्ञान इत्यादि कारणांमुळें ही नोंद कमी झाली.

सिलोनच्या नव्या घटनेचा विचार करण्यासाठीं सोलब्यूरी कमिशन इ. स. १९४४ मध्यें तेथें गेलें. ३१ आक्टोबर १९४५ ला त्याचा रिपोर्ट कायदेशीर रीत्या प्रसिद्ध झाला. त्यामध्यें हिंदी लोकांना अनेक कारणांखालीं सभासदत्व, प्रतिनिधित्व, नागरिकत्व व त्या देशांत प्रवेश नाकारला. १९४७ च्या सप्टेंबरमध्यें तेथें नव्या घटनेप्रमाणें निवडणुका झाल्या. १०१ जागांपैकीं हिंदी लोकांना फक्त ७ जागा मिळाल्या. मंत्रिमंडळांत एकाहि हिंदी सभासदाला प्रवेश मिळाला नाहीं.

इ. स. १९४८ च्या ऑक्टोबरमध्यें सिलोन सरकारनें नागरिकत्वासंबंधीं दुसरा कायदा पास केला. त्या कायद्याप्रमाणें नागरिकत्वामध्यें त्यांनीं दोन भेद पाडले. एक जन्मानें प्राप्त झालेलें व दुसरें नांवें नोंदवून. जन्मानें नागरिकत्व मिळण्यासाठीं प्रत्येकानें आपले वडील व आजोबा यांचा जन्म सिलोनमध्यें झाला हें सिद्ध केलें पाहिजे. ही गोष्ट हिंदी मजुरांना अशक्य होती. त्याचप्रमाणें १९३९ च्या आधीं सिलोनमध्यें जाऊन जास्तींत जास्त नऊ महिन्यांचा खंड न पाडतां सतत राहणाऱ्या इसमांनाच नागरिक म्हणून नांवें नोंदविण्याचा अधिकार मिळाला. वरील दोन्ही प्रकारच्या नागरिकत्वांमध्यें पंक्तिप्रपंच जाणवूं लागला. मतदानासाठीं इ. स. १९३१ च्या संपत्तीच्या अटी तर होत्याच, परंतु त्यांच्या भरीला हे निर्बंध लादण्यांत आले. त्यामुळें आज जवळजवळ २ लाख हिंदी लोकांना मतदानाचा हक्क नाकारला गेला आहे.

मामा-भाच्या यांचे विवाह हिंदुस्थानांत होतात. सिलोन सरकारनें ते नामंजूर ठरवून अशा लोकांना नागरिकत्व देण्याचें नाकारलें. अनेक पत्नी असलेल्यांना कायद्याच्या अडचणी भासूं लागल्या. १ नोव्हेंबर १९४९ च्या नंतर आलेल्या नागरिकांना रेशनकार्डें देण्याचें नाकारलें. त्यांना तांदूळ काळ्याबाजारांतून दुप्पट-तिप्पट किंमत देऊन घेणें भाग पडलें. या कायद्यामुळें २०,००० हिंदी मजुरांना सरकारी धान्याच्या सवलती बंद करण्यांत आल्या.

सिलोनमध्यें आज बहुसंख्य हिंदी लोकांना मानवाचे मूलभूत अधिकार देखील नाकारण्यांत आले आहेत. याच्या मुळाशीं राजकीय आणि आर्थिक आक्रमणाची भीति मुख्यतः वावरत आहे. आज सिलोनमध्यें जवळजवळ १६ टक्के लोक हिंदी आहेत. ही संख्या अशीच वाढत गेली, तर हिंदी लोकांची संख्या मोठी होईल व एक दिवस ते सिलोनी लोकांचें राजकीय स्वातंत्र्य धोक्यांत आणतील, ही भीति तेथील सरकारला बेचैन करीत आहे. त्याचप्रमाणें आज तेथें हिंदी मजूर व सिलोनी मजूर यांच्यामध्यें कामाबद्दल स्पर्धा निर्माण झाली आहे. सिलोनी मजूर आज तेथें पुष्कळ प्रमाणांत बेकार आहे. हिंदी मजुरांत हें प्रमाण अत्यल्प आहे. तेथील व्यापाऱ्यांना हिंदी व्यापाऱ्यांशीं स्पर्धा जाचक वाटते. हें आर्थिक आक्रमण त्यांना अधिक कडवें बनवीत आहे.

हिंदी जनतेनें व सरकारनें आपल्या धोरणानें सिलोनी सरकारची राजकीय भीति खोटी आहे असें दाखवून दिलें पाहिजे. ही आक्रमणाची भीति त्यांच्या मनांतून काढून टाकणें हा एकच मार्ग सर्वोत्कृष्ट आणि चिरस्थायी आहे. त्याचप्रमाणें तेथील हिंदी जनतेनें सिलोन हीच आपली मातृभूमि मानून तिला आपली सर्व निष्ठा अर्पण केली पाहिजे. हिंदुस्थानकडे मायभूमि म्हणून पाहण्याचें त्यांनीं टाकून देणें जरूर आहे. इंग्लिश लोक पूर्वी कॅनडामध्यें स्थायिक झाले. पुढें त्यांनीं कानडा हीच आपली मायभूमि मानायला सुरुवात केली. सिलोनी हिंदी लोकांनीं हाच कित्ता गिरविला पाहिजे. शिवाय तेथील हिंदी व्यापाऱ्यांनीं तेथें मिळविलेला पैसा हिंदुस्थानांत न गुंतवितां, त्याच देशामध्यें गुंतवून तेथील उत्कर्षाला हातभार लावला पाहिजे. या मार्गांनीं आपण पावलें टाकलीं तरच हा प्रश्न समाधानकारकरीत्या सुटेल असें वाटतें.

## आफ्रिकेंतील भारतीय

इ. स. १८६० सालीं द. आफ्रिकेंतील नाताळमध्यें हिंदी मजुरांची पहिली तुकडी ऊंसाच्या








मळ्यांत राबण्यासाठीं गेली. इ. स. १८३३ मध्यें इंग्लंडनें गुलामगिरी कायद्यानें नष्ट केली व गुलामांना अनेक शतकांनंतर मानवाचे हक्क अर्पण केले. परंतु त्यामुळें नाताळमधील मळेवाल्या इंग्रजांची कुचंबणा सुरू झाली. त्यांना मजुरांची उणीव तीव्रतेनें भासूं लागली. हिंदुस्थान-सरकारशीं पांच वर्षांचा करार करून नाताळनें हिंदी मजूर तिकडे बोलाविले. जमीन खरेदी करणें, मतदानाचा हक्क देणें, नागरिक म्हणून वागविलें जाणें इत्यादि सर्व अटी त्या वेळीं मान्य करण्यांत आल्या होत्या.

परंतु हिंदी मजुरांनंतर हळूहळू पारशी, मुसलमान, गुजराती इत्यादि व्यापारी तिकडे जाऊं लागले. या व्यापारी वर्गाची आर्थिक स्पर्धा तेथील मळेवाल्या इंग्रजांना बाधक वाटूं लागली. त्यामुळेंच हिंदी लोकांविरुद्ध कडक कायदे करायला सुरुवात झाली. इ. स. १८९४ मध्यें नाताळ-सरकारनें प्रथम कायद्याचें शस्त्र उपसलें. वर्षाला ८–९ पौंड उत्पन्न असणाऱ्या हिंदी मजुरांवर दरवर्षी ३ पौंड कर लादला गेला. शिवाय त्यांचा मतदानाचा अधिकार काढून घेण्यांत आला. त्या वेळीं नाताळांत १०,००० युरोपिअन मतदार होते, तर फक्त २५० हिंदी मतदार होते. हा कायदा होण्याच्या आदल्या वर्षी म. गांधी नाताळांत गेले होते. त्यांनीं या अन्याय्य कायद्याविरुद्ध १०,००० लोकांच्या सह्यांच्या अर्ज हिंदुस्थान सरकारकडे पाठविला. इ. स. १८९४ सालीं गांधींनीं ' साऊथ आफ्रिकन इंडिअन काँग्रेस ' स्थापन केली. हा असंतोष चालू ठेवण्यासाठीं पुढें १९०४ सालीं ' इंडियन ओपिनिअन ' हें साप्ताहिक गुजराती, हिंदी, तामीळ व इंग्रजींतून प्रसिद्ध करावयास सुरुवात केली. हिंदुस्थानांत ना. गोखले, फिरोजशहा मेथा, न्या. रानडे, लो. टिळक इत्यादि पुढाऱ्यांना भेटून तेथील अन्यायाला जाहीर वाचा फोडली.

नाताळप्रमाणें ट्रान्सवालमध्यें इ. स. १८८१ मध्ये प्रथम हिंदी मजुरांनीं प्रवेश केला. इ. स. १८८५ सालीं, हिंदी लोकांनीं ठराविक भागांतच राहिलें पाहिजे व व्यापार केला पाहिजे, असा निर्बंध लादला गेला. २२ ऑगष्ट १९०६ ला ' काळा कायदा ' प्रसिद्ध झाला. या कायद्यानें सर्व हिंदी लोकांना सक्तीनें राहण्यासाठीं व व्यापारासाठीं परवाने घ्यावे लागत. गुन्हेगारांप्रमाणें बोटांचे ठसे द्यावे लागत. अंगावरील खुणा नोंदविल्या जात व अस्पृश्यांप्रमाणें स्वतंत्र परंतु घाणेरड्या वस्तींत राहावयास लागे. हिंदी मजुरांना वर्णद्वेषाच्या नांवाखालीं अत्यंत तुच्छतेनें गुलामांसारखें वागविलें जाई. त्या जाचाला कंटाळून अनेक हिंदी मजुरांनीं आत्महत्या करून मृत्यूला कवटाळिलें होतें. या आगींत तेल ओतण्यासाठीं १४–३–१९१३ ला केपच्या सुप्रीम कोर्टानें असा एक निर्णय दिला कीं, ' ख्रिस्ती पद्धतीनें झालेले व रजिस्ट्रारनें नोंदविलेले विवाहच फक्त कायदेशीर मानले जातील. '. या निर्णयामुळें हिंदी लोकांच्या बायका एकदम रखेल्या ठरल्या व मुलें अनौरस संतति ठरली ! हा घाव हिंदी लोकांच्या मर्मीं लागला.

म. गांधींनीं ' काळ्या कायद्या 'विरुद्ध १९०७ सालीं सामुदायिक सत्याग्रह केला. त्या वेळीं ट्रान्सवालमधील १३ हजार मजुरांपैकीं फक्त ५०० लोकांनीं आपले ठसे देऊन नांवें नोंदवून घेतलीं. पुढें २३-९-१९१३ या दिवशीं नाताळमधील कोळशाच्या खाणींत संप झाला व लोकांनीं ट्रान्सवालमध्यें कायदेभंग करून प्रवेश केला. या संपामध्यें २०३७ पुरुष, १२७ स्त्रिया व ५७ मुलें होतीं. या शांततामय सत्याग्रहाला जगाच्या इतिहासांत तोड मिळणें कठीण आहे.

परंतु म. गांधींच्या सत्याग्रहाचा परिणाम म्हणून असो वा युरोपांत त्या वेळीं महायुद्धाचें रणकुंड पेटलें म्हणून असो, २१-१-१९१४ ला ' इंडिअन रिलीफ बिल ' पास करण्यांत आलें व हिंदी लोकांवरील नाताळ व ट्रान्सवालमधील वर्णवैषम्याचीं, व्यापाराचीं व निवासस्थानाचीं अनेक बंधनें ढिलीं करण्यांत आलीं.

इ. स. १९१४ ते १९१८ पर्यंत हिंदी लोकांना आफ्रिकेंत विशेष त्रास झाला नाहीं. कारण त्या वेळीं पुष्कळसे इंग्रज मळेवाले युद्धकार्यांत गुंतले होते व त्यांना त्या वेळीं हिंदी मजुरांची गरज तीव्रतेनें भासत होती. परंतु युद्ध संपल्या-










बरोबर इ. स. १९१८ सालीं द. आफ्रिकेंतील रेल्वे-प्रवासांतील वर्णभेद कायद्यानें वज्रलेप करून टाकला. रेल्वेमध्यें काळा-गोरा भेद अत्यंत हीन पातळी-वरून सुरू झाला. इ. स. १९१९ सालीं ट्रान्सवाल सरकारनें हिंदी व्यापारी व हिंदी मजूर यांच्या राहणीवर व फिरण्यावर अपमानकारक बंधनें लादलीं. इ. स. १९२४ सालीं 'दि क्लास एरियाज् बिल' यूनियन सरकारनें मंजूर केलें. इ. स. १९१० सालीं ट्रान्सवाल, नाताळ, ऑरेंज फ्री स्टेट व केप ऑफ् गुड होप या घटकराज्यांचें यूनियन-सरकार स्थापन झालें होतें. या कायद्या-मुळें चारहि राज्यांत हिंदी लोकांना गांवाबाहेरील महारवाड्याप्रमाणें गलिच्छ वस्तींत राहावें लागलें व तेवढ्याच मर्यादित भागांत व्यापार करावा लागला. या कायद्यानें हिंदी लोकांनाच नव्हे, तर मानवतेला लाजेनें मान खालीं घालण्याचा दु:खद प्रसंग आणला.

पुढें इ. स. १९२७ च्या फेब्रुवारीमध्यें केप टाऊन येथें हिंदुस्थान-सरकारचे प्रतिनिधी व द. आफ्रिकेच्या यूनियन-सरकारचे प्रतिनिधी यांच्या-मध्यें हिंदी लोकांच्या प्रश्नांबाबत 'सन्मान्य तडजोड' झाली. या तडजोडींत असें ठरलें कीं, (१) द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांना पाश्चात्त्य जीवनाचा दर्जा द्यावा. (२) इ. स. १९२४ चा 'दि क्लास एरियाज' कायदा रद्द करावा. (३) हिंदुस्थान सरकारनें आपला प्रतिनिधी आफ्रिकेंत ठेवावा.—परंतु ही तडजोड झाल्यावर थोड्याच दिवसांत उपाहारगृहें व सिनेमागृहें इथें 'कुत्रीं व हिंदी माणसें यांना आंत येण्यास बंदी आहे' अशा पाट्या लागल्या व तडजोड पायदळीं तुडविली गेली. म्हणून इ. स. १९३२ सालीं केप टाऊन येथें पुन्हां गोलमेज परिषद् भरवून पूर्वीच्या 'सन्मान्य तडजोडी'ची उजळणी करण्यांत आली. पण नंतर युरोपिअन मळेवाल्यां-नीं या तडजोडीची पुन्हां आपल्या वर्तनानें क्रूर हेटाळणीच केली.

इ. स. १९४३ सालीं नाताळमध्यें सार्वत्रिक निवडणुका होत्या. त्याच्या आधीं युरोपिअन मळेवाल्यांनीं जनरल स्मट्स् यांच्यावर दडपण आणून 'Trading and Occupation of Land (Transvaal & Natal) Restriction Act' हा कायदा पास करवून घेतला. हाच कायदा 'पेगिंग कायदा' म्हणून प्रसिद्ध आहे. या कायद्यानें नाताळ आणि ट्रान्सवालमध्यें हिंदी लोकांना नवी जागा खरेदी करण्यास वा असलेली जागा बदलण्यास कायद्यानें मज्जाव केला. इ. स. १९२७ च्या केप टाऊन परिषदेनें हिंदी लोकांना शहराच्या वाटेल त्या भागांत राहण्यास, जागा घेण्यास व व्यापार करण्यास मुभा दिली होती. त्यामुळें हिंदी लोकांचा थोडा फार प्रवेश युरोपि-अन वस्तींत झाला. तो असह्य झाल्यामुळें त्याला वेळींच आळा घालावा म्हणून हा कायदा पास करण्यांत आला.

या पेगिंग कायद्याविरुद्ध हिंदुस्थानांत तीव्र प्रतिक्रिया उमटल्या. 'जशास तसें' या न्यायानें हिंदुस्थान सरकारनें भारतांतील आफ्रिकन इंग्लिशां-वर वरीलप्रमाणेंच बंधनें लादलीं. डॉ. ना. भि. खरे हे त्या वेळीं मध्यवर्ती सरकारच्या मंत्रिमंडळांत होते. त्या वेळीं मध्यवर्ती सभागृहांत भाषण करतांना तर त्यांनीं असे उद्गार काढले : 'I wish, India was in a position to declare war against South Africa here and now.'

परंतु हिंदुस्थान-सरकारच्या या निषेधाला उत्तर म्हणून इ. स. १९४६ च्या जूनमध्यें द. आफ्रिकेच्या युनियन सरकारनें 'Asiatic Land Tenure & Indian Representation Act' पास केला. या कायद्यानें स्थावर मिळकतीचा व्यवहार काळे आणि गोरे यांच्यामध्यें करण्यासाठीं मंत्र्याची परवानगी घेणें भाग पडलें व त्याप्रमाणें हिंदी लोकांची वसाहत शहराच्या बाहेर घाणेरड्या वस्तींत करणें कायद्यानें बंधनकारक ठरलें. शिवाय, जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतील 'काळे-गोरे' हा वर्णभेद उजळ माथ्यानें सर्वत्र वावरूं लागला. प्रवास, शिक्षण, व्यापार, वस्ती या प्रत्येक ठिकाणीं हिंदी लोकांना क्षुद्राप्रमाणें वागविलें जाऊं लागलें. गेल्या पन्नास वर्षांतील अपमानकारक कायद्यांची परिसीमा म्हणजेच हा कायदा होय !

२२ जून १९४६ ला आफ्रिकेंतील हिंदी



अनुक्रमणिका

लोकांचें गाऱ्हाणें हिंदुस्थान सरकारनें यूनोच्या परिषदेंत मांडलें. १९४६ सालीं यूनोनें दक्षिण आफ्रिकेंतील वर्ण आणि वंशविषयक विषमतेविरुद्ध ठराव पास केला. त्या वेळीं हिंदुस्थानला फ्रान्स, दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रें, रशिया, मध्य आशियांतील मुस्लिम राष्ट्रें व आशियांतील राष्ट्रें यांनीं निःसंदिग्धपणें पाठिंबा दिला. परंतु पुढें इ. स. १९४७ सालीं द. आफ्रिकेसंबंधींचा ठराव त्या राष्ट्राला अनुकूल असा पास झाला. या वेळीं यूनोचा ठराव हिंदुस्थानविरुद्ध पास झाला याचें मुख्य कारण म्हणजे यूनोमध्यें त्या वेळीं आशियाविरुद्ध यूरोप, अमेरिका असे गट पडले होते. त्याचप्रमाणें कम्युनिस्टविरोधी सारीं यूरोप-अमेरिकेचीं राष्ट्रें असाहि त्यांत नवा प्रश्न उपस्थित झाला. वंशश्रेष्ठता हें फासिझमचें तत्त्व असल्यानें रशिया, युगोस्लाव्हिया या कम्युनिस्ट राष्ट्रांनीं भारताला संपूर्ण पाठिंबा दिला, तर द. आफ्रिका कम्युनिस्टांचें पक्के दुष्मन् असल्यानें अमेरिका-इंग्लंडनीं त्याला संरक्षण दिलें. या नव्या वळणामुळें प्रश्नाचा निर्णय त्याच्या गुणावगुणावर न होतां भलत्याच प्रकारें लावला गेला. शिवाय, स्पेनमधील फ्रँकोसंबंधीं हिंदुस्थाननें जीं मतें व्यक्त केलीं त्यामुळें दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रांचा पाठिंबा भारताला गमवावा लागला.

१९४८ च्या निवडणुकींत 'मवाळ' जनरल स्मट्स्चा पराभव होऊन डॉ. मालनच्या नॅशनॅलिस्ट पार्टीला अधिकारसूत्रें मिळालीं. डॉ. मालन हे वंशद्वेष्टे, काळे-गोरे भेद करणारे उद्धट अस्सल फॅसिस्ट आहेत. त्यांच्या कारकीर्दींत गेल्या ५ वर्षांत हिंदी लोकांवरील जुलूम नव्या जोमानें उफाळून येत आहे.

नुकतीच १५ एप्रिल १९५३ ला दक्षिण आफ्रिकेच्या राज्यसंघाची निवडणूक झाली. त्यामध्यें नॅशनॅलिस्ट पक्षाला ९४ जागा मिळाल्या. संयुक्त विरोधी पक्षाचे ५४ उमेदवार यशस्वी झाले व लेबर पक्षानें ५ जागा मिळविल्या. या निवडणुकींत डॉ. मालन यांच्या नॅशनॅलिस्ट पक्षाला ४५ टक्के मतें पडली, परंतु जागा मात्र ६१ टक्के मिळवितां आल्या. उलट जनरल स्मट्स् यांच्या संयुक्त पक्षाला ५५ टक्के मतें मिळालीं आणि जागा अवघ्या ३९ टक्के मिळाल्या. निवडणुकींतील मतदारसंघांच्या विशिष्ट रचनेमुळें डॉ. मालन यांना हा फायदा झाला. नॅशनॅलिस्ट पक्षाचा विजय या दृष्टीनें पाहिलें तर खरा विजय म्हणतां येणार नाहीं. शिवाय तेथील एकूण मतदार १६,३४,१५५ होते. परंतु त्यांमध्यें १ कोट आशियाई लोकांना वर्णविषमतेमुळें मताधिकार नाकारला होता. त्यामुळें डॉ. मालनचा विजय हा लोकशाहीचा विजय मानतां येणार नाहीं.

नॅशनॅलिस्ट पक्ष अधिकारावर आल्याबरोबर त्यानें हिंदी लोकांना आफ्रिकेंत येण्यास कायद्यानें मज्जाव करण्याचा ठराव पास करण्याची खटपट सुरू केली आहे. आशियाई लोकांना अन्यायाच्या परिमार्जनार्थ न्यायकोर्टाकडे धांव घेतां यावी म्हणून ठराव करून त्यांना न्यायकोर्टावर पार्लमेंटचें सार्वभौमत्व प्रस्थापित करायचें आहे. घटनेंत २/३ सभासदांच्या बहुमतानें हा बदल करतां येतो. डॉ. मालन यांना यासाठीं फक्त १२-१३ मतें विरोधी पक्षांतून हवीं आहेत. या विजयी पक्षामुळें हिंदी लोकांबरोबर आफ्रिकेंत राहणाऱ्या इंग्लंडच्या व्यापारी वर्गाला देखील त्रास सुरू झाला आहे. आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांना इतर गोऱ्यांची व्यापारी स्पर्धा नकोशी वाटते. इंग्लंडनें याबाबत कांहीं हस्तक्षेप केला, तर राष्ट्रकुटुंबांतून फुटून निघण्याची दहशत त्यांनीं आतांपासून द्यायला सुरुवात केली आहे. त्याचप्रमाणें प्रॉटेस्टंट पंथाचा प्रभाव येथें सत्तारूढ अधिकारी व नॅशनॅलिस्ट पक्षावर मोठा आहे. त्यामुळें प्रॉटेस्टंटाशिवाय इतर पंथीयांच्या सवलती काढून त्यांना तेथें धर्मप्रचारास बंदी करण्याकडे त्यांचा कल झुकत आहे. असें झालें तर तें अर्धेंअधिक धर्माधिष्ठित राज्य म्हणूनच संबोधावें लागेल.

डॉ. मालन यांच्यानंतर त्यांच्याहूनहि वर्णविषमतेबद्दल अत्यंत कडक धोरण स्वीकारणारे जे. जी. स्ट्रिडम त्यांच्या जागीं येतील. त्यामुळें पूर्व आफ्रिकेंतील माऊ माऊ चळवळीप्रमाणें दक्षिणेंत देखील अत्याचारी चळवळ सुरू झाल्यावांचून राहणार नाहीं. द. आफ्रिकेंत आज २६ लक्ष गोरे



अनुक्रमणिका








आहेत, ८५ लक्ष नीग्रो, ११ लक्ष संमिश्र रक्ताचे व ३,६५००० आशियाई आहेत. अल्पसंख्य गोऱ्यांना एवढ्या मोठ्या असंतुष्ट प्रजेवर शस्त्राच्या जोरावर फार काळ राज्य करतां येणार नाहीं. चालू दडपशाहींतून अंतर्गत यादवी व कदाचित् पं. नेहरूंनीं दिल्लीच्या सभेंत म्हटल्याप्रमाणें जागतिक युद्धहि निर्माण होण्याचा संभव आहे.

आफ्रिकेंतील आजच्या प्रश्नाचें स्वरूप तिहेरी आहे. त्यांत वंशश्रेष्ठता आहे. युरोपियनांना वाटतें, 'आम्ही जन्मानें आणि वंशानेंच हिंदी, आशियाई व तेथील मूळच्या झुलू–नीग्रो लोकांपेक्षां उच्च आहोंत!' वंशश्रेष्ठतेप्रमाणें नव्यानें उदयाला आलेला राष्ट्रवाद देखील त्या छळांत डोकावत आहे. परंतु वरील दोन्ही कारणांपेक्षां आर्थिक सत्तेची लालसा हें कारण आफ्रिकेंतील संघर्षाच्या मुळाशीं जास्त प्रामुख्यानें दिसून येतें. तेथील युरोपिअन मळेवाले व व्यापारी यांना हिंदी व्यापाऱ्यांची स्पर्धा हानिकारक वाटते. त्यांच्या आर्थिक सत्तेला तो मोठा शह वाटतो. त्यांना तेथून हुसकून लावलें म्हणजे शतक-अर्धशतक तरी युरोपिअनच त्या देशाचे आर्थिक दृष्ट्या निश्चित अनाभिषिक्त राजे ठरणार! वंशद्वेष व राष्ट्रवाद हीं देखील या आर्थिक सत्तेचींच केवळ साधनें असण्याचा संभव आहे.

जगाचें मत अनुकूल करून दक्षिण आफ्रिकेवर न्याय्य दडपण आणणें हाच याला लांबचा परंतु भरंवशाचा मार्ग आहे. तेथील हिंदी लोकांनीं द. आफ्रिका हीच आपली मातृभूमि मानणें जरूर आहे. दोन्ही देशांत सांस्कृतिक संबंध निर्माण करण्यासाठीं वरचेवर विविध मंडळें व कलापथकें परस्परांनीं एकमेकांकडे पाठविलीं पाहिजेत. वंशश्रेष्ठता व रक्ताची शुद्धता या भ्रामक कल्पना तेथील गोऱ्यांच्या डोक्यांतून गेल्या पाहिजेत.

## ब्रह्मदेशांतील भारतीय

इ. स. १९३६ ची घटना अंमलांत येईपर्यंत ब्रह्मदेश हा भारताचा अविभाज्य घटक होता. त्यामुळें प्रतिवर्षीं हजारों हिंदवासी त्या देशामध्यें मजुरीसाठीं व व्यापाराप्रीत्यर्थ जात असत. हिंदी मजुरांनीं ब्रह्मदेशच्या शेतीपेक्षां उद्योगधंद्याकडेच त्या वेळीं खूप लक्ष दिलें होतें. इ. स. १९२१ मध्यें ग्रॅन्थॅमचा अहवाल ( Grantham's Report ) प्रसिद्ध झाला होता. त्यामध्यें म्हटलें आहे कीं, "शेतीवर राबणाऱ्या मजुरांमध्यें ब्रह्मी मजूर शें. ९६ टक्के आहेत तर हिंदी मजूर शें. ४ टक्क्यांहून देखील कमी आहेत! औद्योगिक क्षेत्रामध्यें मात्र हिंदी कारागीर ( skilled labourers ) व हिंदी राबणारे मजूर ( unskilled labourers ) यांनीं मोठें स्थान व्यापलें होतें. या क्षेत्रांत हिंदी लोक शें. ६९ टक्के होते, तर ब्रह्मी अवघे २६ टक्के होते. खुद्द रंगून शहरामध्यें हिंदी कारागीर शें. ६० टक्के व राबणारे मजूर शें. ९५ टक्के होते. ब्रह्मी देशांतील ब्रह्मी मजुरांचें प्रमाण अनुक्रमें २७ व ४ टक्के असें होतें.

ब्रह्मदेशांतील मजुरांना भारतीयांचें हें आक्रमण आवडणें शक्यच नव्हतें. शिवाय सांस्कृतिक व भौगोलिक दृष्ट्या दोन्ही देशांत फार मोठें साम्य नसल्यामुळें ब्रह्मदेशानें स्वतंत्र राज्याची मागणी केली. त्यामुळें त्यांना १९३५ च्या घटनेप्रमाणें हिंदुस्थानपासून अलग करण्यांत आलें.

इ. स. १९३५ ते १९४८ या काळांत त्यांनीं स्वतःच्या प्रगतीच्या दृष्टीनें बरींच पावलें टाकण्याचा प्रयत्न केला. १९३९ च्या रिपोर्टप्रमाणें हिंदी कारागिरांचें प्रमाण ५६·३ ते ५८·४ पर्यंत खालीं आलें व मजुरांचें प्रमाण ६८·३ ते ६९·५ पर्यंत रेंगाळत राहिलें.

इ. स. १९३९ मध्यें दुसरें जागतिक युद्ध सुरू झालें. इ. स. १९४२ सालीं जपानचे हल्ले ब्रह्मदेशावर सुरू झाले. युद्धाच्या भयानें हजारों भारतवासी तो देश सोडून इकडे आले. १ जानेवारी १९४८ ला ब्रह्मदेशाला भारताप्रमाणें संपूर्ण स्वातंत्र्य मिळालें. इ. स. १९४८ च्या कायद्याप्रमाणें हिंदी लोकांच्या नागरिकत्वासंबंधीं ब्रह्मी सरकारनें कांहीं निर्बंध घातले. त्यांतील एका निर्बंधाप्रमाणें १ जानेवारी १९४२ च्या आधीं सतत ८ वर्षें किंवा ४ जानेवारी १९४८ च्या पूर्वीं अखंडपणें ८ वर्षें त्या देशांत राहणारांनाच नागरिकत्व प्राप्त होऊं शकतें. ब्रह्मदेशांत जवळजवळ ७ लाख लोक हिंदी आहेत. त्यांपैकीं दोन








लाख लोकांनीं कायद्यानें नागरिकत्व नोंदविलें आहे.

नागरिकत्वाप्रमाणें शेती, व्यापार, बँका यांवर तेथील सरकारनें बंधनें घातलीं आहेत. इ. स. १९४१ च्या 'जमीनखरेदी बिला' प्रमाणें सरकार कोणतीहि जमीन अल्प मोबदला देऊन ताब्यांत घेऊं शकतें. जमीन नसणारांना कसायला जमीन मिळवून देणें हा या कायद्याचा मुख्य हेतु होता. इ. स. १९४८ सालीं त्यांनीं Land Nationalisation Act पास केला. या कायद्यानें जमीन न कसणारा त्या जमिनीचा मालक असूं शकत नाहीं व कसणारा ५० एकरांपेक्षां जास्त जमीन स्वतःकडे ठेवूं शकत नाहीं. ब्रह्मदेशांत १२० लक्ष भाताचीं खाचरें आहेत. त्यांपैकीं ३० लक्ष खाचरें फक्त ५००० हिंदी लोकांकडे आहेत. या कायद्यानें हिंदी लोकांच्या मालमत्तेला मोठा धक्का बसला. इ. स. १९४८ च्या The Land Alienation Act प्रमाणें ब्रह्मदेशाच्या रहिवाशी नसलेल्या इसमाला जमीन विकणें बेकायदेशीर ठरविलें. १९४७च्या टेनन्सी स्टँडर्ड रेंट ॲक्टप्रमाणें शेतसाऱ्याच्या फक्त दुप्पट खंड जमीनमालकाला कुळाकडून घेण्याचा अधिकार दिला. स्थावर मिळकतीच्या कायद्यानुसार घरेंदारें परदेशाच्या नागरिकांना मालकीनें देणें वा घेणें बेकायदेशीर ठरविलें. खुद्द रंगून शहरामध्यें २॥ लाख हिंदी लोकांनीं शें. ७० टक्के घरें विकत घेतलेलीं होतीं. त्याचप्रमाणें ५० टक्के सिनेमाव्यवसायासारखे इतर व्यवसाय हातांत घेतले होते. या कायद्यानें नागरिकत्व न मिळालेल्या हिंदी लोकांना आर्थिक दृष्ट्या फार नुकसान सोसावें लागलें.

मद्रासेकडील चेट्टि लोकांनीं तिकडे बँका व इतर स्थावर मिळकतींत मोठें भांडवल गुंतविलें आहे. या सधन हिंदीवर्गाला ब्रह्मदेशाच्या नव्या कायद्यानें फार त्रास झाला.

परंतु ब्रह्मदेशांतील हा त्रास आफ्रिका किंवा सिलोनसारखा अन्याय्य म्हणतां येणार नाहीं. त्या देशाच्या पुनरुज्जीवनासाठीं हा आर्थिक बदल आवश्यक म्हटला पाहिजे. त्या देशाला युद्धकाळांत झालेलें अपरंपार नुकसान भरून काढावयाचें होतें. कम्युनिझमची लाल लाट थोपवून धरण्यासाठीं देशांतील बेकारी व दारिद्र्य यांना तोंड द्यावयाचें होतें. लोककल्याणकारी योजना हातीं घ्यावयाच्या होत्या. अशा परिस्थितींत कांहीं सधन हिंदी लोकांवर बंधनें पडलीं तर तीं बंधनें हा वर्ग केवळ हिंदी म्हणून जुलमाचीं ठरवितां येणार नाहींत.

ब्रह्मदेशाप्रमाणें इतर देशांतहि भारतीयांची संख्या थोडीफार पसरली आहे. परंतु तेथील प्रश्न एवढे गंभीर म्हणतां येणार नाहींत. फिजी बेटांत हिंदी लोकांची संख्या तेथील मूळच्या लोकांपेक्षां दीड लक्षानें अधिक आहे. वेस्ट इंडीजमध्यें भारतीयांची संख्याहि मोठी आहे. त्रिनिदादमध्यें भारतीयांची संख्या सुमारें अडीच लाख असून तेथील एकूण लोकसंख्येशीं हें प्रमाण $\frac{1}{3}$ इतकें आहे. मलायामध्यें पाऊण लाख भारतीय आहेत. ब्रिटिश गयानामध्यें आफ्रिकन लोकांपेक्षां भारतीय दीड लाखांनीं जास्त आहेत. याव्यतिरिक्त तेथें इतर देशांचे लोक सुमारें एक लाख आहेत. भारतीयांचा गट त्यामुळें तेथें सर्वांत मोठा आहे. पुढील दहा वर्षांत भारतीय तर तेथें एकूण लोकसंख्येंत निम्म्यानें होतील. या प्रदेशांत अद्याप भारतीयांना व्यापार, मताधिकार, प्रतिनिधित्व वा नागरिकत्व यांबद्दल फारशा कायद्याच्या अडचणी जाणवत नाहींत.

आस्ट्रेलिया, न्यू झीलंड यांसारखे देश इतर देशांतील नागरिकांना प्रवेश नाकारीत आहेत. आस्ट्रेलियामध्यें आज लाखों एकर जमीन लागवडीखालीं आणतां येण्यासारखी आहे. आस्ट्रेलियानें इतर नागरिकांना सामावून घ्यायचें ठरविलें तर भारताचाच नव्हे तर जगाचा प्रश्न सुलभ होईल. परंतु त्यामध्यें देखील राष्ट्रवाद आडवा येत आहे. राष्ट्रवाद आणि आंतरराष्ट्रवाद यांचीं नातीं परस्परांशीं शत्रुत्वाचीं असतात. या दोन तलवारी एकाच म्यानांत बसूं शकत नाहींत. राष्ट्रवाद हा अखेरीस शेवटीं एक जमातीचा दृष्टिकोन ( tribal outlook ) आहे. त्यामधील सामूहिक अहंकार ( collective ego ) जागतिक राष्ट्राला मारक ठरणार आहे. प्रदेशाप्रदेशाच्या सीमा नष्ट होऊन जग हेंच एक विशाल कुटुंब घडवायचें असलें तर राष्ट्रवादाला विराम द्यावा लागेल.








श्री. स. शं. देसाई

# अमेरिकेंतील लेखकांची आर्थिक स्थिति

अलीकडे लेखकांची आर्थिक स्थिति दिवसें-दिवस हलाखीची होत चालली असल्याचें वरचेवर ऐकूं येत असल्यानें, त्यासंबंधीं चौकशी करण्याकरितां अमेरिकेंतील 'सॅटर्डे रिव्ह्यू ऑफ लिटरेचर' ह्या साहित्य, संगीत, चित्रकला, नाट्य, सिनेमा इत्यादि कलांना वाहिलेल्या प्रसिद्ध नियतकालिकानें पुढाकार घेतला होता. प्रस्तुत नियतकालिकाच्या संचालक-मंडळानें गेल्या वर्षाच्या सुरुवातीस सप्टेंबर १९५० ते १९५१ ची अखेर ह्या दरम्यान ज्यांचे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत अशा दीडशें प्रथितयश लेखकांकडे त्यांच्या पुस्तकांच्या स्वरूपाविषयीं, आर्थिक परिस्थितीविषयीं माहिती गोळा करण्याकरितां एक प्रश्नावली पाठविली. त्यांतील फक्त ४२ लेखकांनीं ती भरून पाठविली. त्यांतील १७ जणांनीं लिहिलें कीं, त्यांच्या अलीकडे प्रकाशित झालेल्या पुस्तकांच्या प्रती १० हजार, ३७ हजार आणि १ लाख अशा खपल्या. २९ जणांनीं लिहिलें कीं, त्यांचा चरितार्थ निव्वळ लेखनाच्या धंद्यावर चालत नाहीं. फक्त १३ जण लेखनाच्या धंद्यावर उपजीविका करीत होते. बाकीच्यांपैकीं ५ शिक्षक, १ डॉक्टर, १ लेखिका नवऱ्याच्या उत्पन्नावर अवलंबून असलेली, कित्येक पत्रकार (कुठल्या ना कुठल्या वृत्तपत्रांत किंवा नियतकालिकांत संपादक, उपसंपादक अथवा साहित्यसमीक्षक म्हणून काम करणारे), १ वडिलार्जित इस्टेटीवर जगणारा व इतर कॉलेजांत प्राध्यापक होते.

त्या ४२ लेखकांपैकीं २४ जणांनीं कळविलें कीं, त्यांचीं नुकतींच प्रकाशित झालेलीं पुस्तकें लिहिण्याकरितां त्यांना एक वर्ष लागलें. एकाला तीन वर्षें लागलीं. दुसऱ्यानें आपलें पुस्तक १० वर्षांतील फावल्या वेळांत लिहिलें होतें. तिसरा म्हणतो कीं, आपल्या पुस्तकाची सामग्री गोळा करण्याकरितां आपल्याला ( पार्ट टाईम ) तीन वर्षें लागलीं व निव्वळ पुस्तक लिहिण्याकरितां एक वर्ष लागलें. फक्त दोनच लेखकांनीं आपलीं पुस्तकें सहा महिन्यांपेक्षां कमी अवधींत लिहिलीं होतीं. त्यांतील एकानें तर आपलें १८ हजार शब्दांचें विनोदी पुस्तक अवघ्या ३५ दिवसांत लिहिलें होतें.

ह्या ४२ लेखकांतील एकाहि लेखकानें आपणास प्रकाशकानें लुबाडल्याची तक्रार केली नाहीं, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. १६ जणांनीं, आपलें पुस्तक खपलें नाहीं, याचा दोष प्रकाशकांना दिला. कांहीं जणांनीं उलट आपलें पुस्तक चांगलें काढल्याबद्दल प्रकाशकांना शाबासकी दिली. कांहीं जणांनीं आपलें पुस्तक खपलें नाहीं म्हणून पुस्तकविक्रेत्यांना दोष दिला. एका लेखकाच्या मित्राला तर त्याचें पुस्तक त्याच्या शहरांतील कुठल्याच पुस्तकाच्या दुकानांत आढळलें नाहीं. कांहीं लेखकांनीं तक्रारी केल्या कीं, सर्क्युलेशन नीट झालें नाहीं, जाहिरात चांगली केली नाहीं व पुस्तकांच्या किंमती जादा ठेवल्या.

एकाहि लेखकानें आपलें पुस्तक आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या कारवायांमुळें किंवा ग्रंथसमीक्षकानें वाईट अभिप्राय दिल्यानें पडलें, अशी तक्रार केली नाहीं. लेखकांनीं अशा अपेक्षा व्यक्त केल्या कीं, चांगली छपाई व्हावी, मोबदला वाढविला जावा, वाचकांची संख्या वाढावी व प्राप्तिकर माफ व्हावा.

अमेरिकन लेखकांच्या वरील उत्तरांचा बारकाईनें अभ्यास केला तर असें दिसून येतें कीं, जोडधंदा केल्याशिवाय अमेरिकन लेखकांना समाधानानें प्रपंच चालविणें शक्य नाहीं. अमेरिकेचे मावळते अध्यक्ष मि. ट्रूमन ह्यांनीं युद्धोत्तर अमेरिकेच्या आर्थिक परिस्थितीची चौकशी करण्याकरितां १९५० सालीं एक चौकशीसमिति नेमली होती. त्या समितीनें प्रे. ट्रूमन ह्यांना जो अहवाल सादर केला, त्यावरून कळून येतें कीं, सर्वसामान्य अमेरिकन कुटुंबाचें सरासरी वार्षिक उत्पन्न ४३३१ डॉलर म्हणजे जवळजवळ पंधरा ते सोळा हजार रुपये आहे. त्या उत्पन्नाशीं जर सर्वसामान्य अमेरिकन लेखकाच्या उत्पन्नाची तुलना केली, तर अमेरिकन लेखक निव्वळ







लेखनाच्या मोबदल्यावर जगूं शकत नाहीं, हें स्पष्ट दिसतें. सर्वसामान्य अमेरिकन लेखकाच्या उत्पन्नाची सरासरी ५०० डॉलर्सपासून ४००० डॉलर्स पर्यंतच आहे. अर्थात् हें उत्पन्न अमेरिकन माणसाच्या सर्वसामान्य उत्पन्नापेक्षां फारच कमी आहे. अमेरिकन लेखकांत अवघे दहा लेखक असे आहेत कीं, त्यांचें उत्पन्न मोठें असून ते आपला प्रपंच लेखनाच्या धंद्यावर चालवीत असतात. अमेरिकन लेखकांची ही आर्थिक स्थिति पाहून एका जपानी लेखकाला मोठाच विस्मय वाटला. एका अमेरिकन वार्ताहरानें त्याची मुलाख घेतली असतां, तो म्हणाला कीं, २० कोट लोकवस्तीच्या एवढ्या मोठ्या खंडप्राय देशांत अवघे १० लेखक लेखन-धंद्यावर जगावेत ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. ह्याच्या उलट सात कोट लोकवस्तीच्या जपान देशांत कमींत कमी १५० लेखक तरी निव्वळ लेखनाच्या धंद्यावर चरितार्थ चालवितात. खरें म्हणजे, सुधारलेल्या देशांत युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिका हा असा एकच देश आहे कीं, तेथें लोक कमी वाचतात. सर्वसामान्य अमेरिकन वाचक वृत्तपत्रांचेंच वाचन अधिक पसंत करतो. त्यामुळें त्या देशांत पुस्तकांपेक्षां वृत्तपत्रेंच अधिक खपत असतात.

आज अमेरिकेंत जवळजवळ १० लाख लोक लेखनाच्या धंद्यांत आहेत. पण वर सांगितल्या-प्रमाणें त्यांतील अगदीं हाताच्या बोटांवर मोजण्या-इतके स्वतंत्र लेखक आहेत. त्या १० लाख लेखकांत ७० हजार पगारी लेखक आहेत. १० हजार लेखक रंगभूमि, सिनेमा, रेडिओ, टेलि-व्हिजन किंवा नियतकालिकें ह्यांत काम करणारे आहेत. बाकीचे असेच फावल्या वेळांत लेखन करणारे आहेत. पण स्वतंत्र लेखक म्हणून पुढें येण्याची त्यांची इच्छा नाहीं.

सर्वसामान्य अमेरिकन मनुष्य हा सुखप्रिय आणि स्वच्छंदी जीवन जगणारा असल्यानें तो त्रासाचें किंवा जिकीरीचें जीवन स्वीकारण्यास तयार नसतो. लेखनाचा धंदा हा एकच असा धंदा आहे कीं, त्यांत तपश्चर्या केल्याशिवाय कुणी लेखक म्हणून प्रसिद्धीस येऊं शकत नाहीं. लेखनकलेवर चरितार्थ साधूं पाहणाऱ्या लेखकानें निदान दहा वर्षें तरी त्या धंद्यांत फुकट उमेदवारी केली पाहिजे. दारिद्र्य, हाल-अपेष्टा, उपासमार, अपमान, अवहेलना ह्यांचा अनुभव घेतला पाहिजे. जीवनानुभव म्हणतात, तो हाच. त्या अनुभवाच्या भट्टींतून तावूनसुलाखून बाहेर पडल्याशिवाय, कोणताहि लेखक मोठा लेखक होऊं शकत नाहीं.

अमेरिकन लेखकांना हें कष्टाचें जीवन नको असतें. अमेरिकेंतील प्रकाशकांची देखील अमेरिकन लेखकांसंबंधीं हीच तक्रार आहे. अमेरिकन लेखकांना तेथील प्रकाशकांचें सांगणें आहे : " आम्ही युरोपिअन किंवा अन्य लेखकांचीं प्रकाशनें स्वीकारतों आणि तुमचीं स्वीकारीत नाहीं म्हणून तुमचा आम्हांवर रोष आहे. पण तुमचें लिखाण खपत नाहीं त्याला आम्ही काय करणार ? तुम्ही युरोपिअन लेखकांसारखे कष्ट करा. तुमच्या लिखाणांतून खरेंखुरें मानवी जीवन आणा. नाना प्रकारचें लैंगिक जीवन, लैंगिक विकृति किंवा दरोडेखोरी म्हणजे खरें मानवी जीवन नव्हे. खऱ्या जीवनाची अनुभूति त्याहून निराळी आहे. लेखक तें जीवन जगला पाहिजे. लेखन ही एक 'हॉबी' म्हणून समजूं नका, तर तो चरितार्था-चा धंदा म्हणून स्वीकारा. आपल्या अभ्यासिकेंत बसून एखाद्या कचेरींतील कामाप्रमाणें दिवसास अमुक पृष्ठांचें लिखाण करा. असें झालें तर तुम्हांस आम्ही भरपूर मोबदला देऊं व तुमचीं पुस्तकें कशीं खपत नाहींत तें पाहूं. "

एका लेखकानें प्रकाशकाला 'लेखकाच्या कवटीं-तून शांपेन पिणारा' असें म्हटलें आहे ('A publisher is a man who drinks champagne out of an author's skull'). बहुतेक सर्व देशांत ही उक्ति सार्थ ठरलेली आहे. पण ज्याअर्थीं एकाहि अमेरिकन लेखकानें आपणांस प्रकाशकानें लुबाडल्याची तक्रार केलेली नाहीं त्याअर्थीं अमेरिकन प्रकाशक प्रामाणिक वाटतो. आणि म्हणून त्यानें अमेरिकन लेखकां-विषयीं ज्या तक्रारी केल्या आहेत त्या खऱ्या असूं शकतील.



अनुक्रमणिका






श्री. त्र्यं. सी. कारखानीस

# कांहीं स्मृतिचित्रें

[ 'महाराष्ट्र-नाटकमंडळी'चे सुप्रसिद्ध संस्थापक, नाटककार आणि नाट्यवाङ्मयाचे व्यासंगी समीक्षक श्री. त्र्यं. सी. उर्फ अण्णासाहेब कारखानीस यांना गेल्या १५ एप्रिल १९५३ ला ८० वें वर्ष संपून ८१ वें वर्ष लागलें. मोठ्या आजारांतून ते नुकतेच उठले. 'नवभारतां'तून त्यांनीं विविध विषयांवर लिहिलेलें वाचकांस विदित आहेच. 'नवभारता' तर्फे त्यांना सुदीर्घ आरोग्यसंपन्न आयुष्य चिंतितों.

श्री. अण्णासाहेबांचे आवडते युरोपीय नाटककार म्हणजे शॉ व इब्सेन हे होत. शॉचीं त्यांना विशेष आवडणारीं नाटकें 'आर्म्स् अॅण्ड द मॅन', 'यू नेव्हर कॅन् टेल', 'द डेव्हिल्स डिसायपल' हीं तीन होत. या तीन नाटकांपैकींहि 'यू नेव्हर कॅन् टेल' हें नाटक त्यांचें विशेष आवडतें असून त्याचें त्यांनीं आतांपर्यंत ११ वेळां तरी पारायण केलें आहे. नुकतेच दिवंगत झालेले प्रसिद्ध तत्त्वज्ञ लेखक सी. ई. एम्. जोड यांचेंहि हें शॉचें नाटक अत्यंत आवडतें होतें. आपल्या वयाच्या ५६ व्या वर्षी त्याविषयीं लिहितांना प्रा. जोड यांनीं आपण त्या नाटकाचें पांच वेळां पारायण केल्याचें म्हटलें आहे. ही गोष्ट लक्षांत घेतल्यास श्री. कारखानीस यांची विवेचक रसिकता उठून दिसेल. इब्सेनच्या 'हेडा गेब्लर' या नाटकाचा अनुवाद श्री. अण्णासाहेब यांनीं केलेला आहे.

श्री. अण्णासाहेब यांचें 'महाराष्ट्र-नाटकमंडळीं'-तील शिष्य नटवर्य श्री. केशवराव दाते यांचा दिल्ली येथें उपराष्ट्रपति श्री. राधाकृष्णन् यांच्या हस्तें नुकताच सत्कार झाला. हें पाहाण्याचें भाग्य श्री. अण्णासाहेबांना लाधलें या गोष्टीचा त्यांच्या-इतकाच त्यांच्या चहात्यांनाहि निःसंशय आनंद व कौतुक वाटलें असेल.

श्री. अण्णासाहेबांनीं आपल्या दीर्घ जीवनांत अनुभविलेल्या विविध प्रसंगांचीं स्मृतिचित्रें लिहून काढलेलीं आहेत. त्यांच्या संग्रहापैकीं कांहीं स्मृति-चित्रें येथें त्यांच्या अनुज्ञेनें दिलीं आहेत. —का. सं. ]

## आगगाडीचा प्रथम परिचय

आगगाडीचा परिचय मला प्रथम कसा झाला?— ती गोष्ट फार गमतीची आहे. आठवण झाली कीं, अजूनहि हंसूं येतें. बालपणीं कोंकणांत (महाडास) असतां वडीलधारी माणसें केव्हां केव्हां गप्पा सांगतांना आगगाडी—आगिन्-गाडी असे शब्द उच्चारीत. ही जी 'गाडी' ती कशी बरें असेल याची कल्पना करण्यांत त्या वयांतहि माझें मन गुंगून जाई. ती आपल्या बैलगाडीसारखी ? का आगिनबोटीसारखी ? आगिनबोटींतून अगदीं दोन वर्षांच्या वयापासून माझा बराच प्रवास झालेला होता. अशा नाना-तऱ्हांनीं आगिनगाडीचें चित्र मनासमोर आणण्याचा मी प्रयत्न करी. पुढें दहा-अकरा वर्षांचा झाल्या-वर वडिलांनीं शिक्षणाकरितां मला पुण्याला नेण्याचें ठरविलें. आगबोटीनें मुंबईस आलों. तेथें गोरेगांवकर रानडेशास्त्री म्हणून वडिलांचे गुरु होते, त्यांच्याकडे उतरलों. दुसऱ्या दिवशीं शास्त्रीबुवांच्या-बरोबर माझे वडील कोणा ओळखीच्या गृहस्था-कडे जावयास मला बरोबर घेऊन निघाले. मधेंच एका मोठ्या वखारीसारख्या इमारतींत आम्ही शिरलों. जिकडे तिकडे रंगीबेरंगी चित्रांचे कागद तसबिरांसारखे लावलेले दिसले. मला वाटलें हें एक मोठें दुकान असावें. त्यांतील ते चित्रांचे कागद पाहण्यांत मी गुंग होऊन गेलों. यांतला एखादा कागद वडिलांनीं विकत घेतला तर किती बरें होईल असा विचार क्षणभर मनांत आला व वडिलांना मी तसें म्हणणार इतक्यांत एकदाहे. सूंऽऽऽऽऽ असा कर्कश कानठळ्या बसतांना, टाकणारा आवाज काढीत धडडडड—लांबग विशेष कायसेसें त्या 'दुकानां'त घुसलें. मीअनुवाद पुढें एकदम ओरडलोंच—'अरे बापरे

या दुकानांत शिरलं!' माझा हा . होती. केवळ शास्त्रीबुवा अन् वडील हंसूंचलागले अन् "अरे, तुला आगिनगाडीपाहावयाची हो पाहा, हीच आगिनगाडी बरं. अन् आ









अनुक्रमणिका

बसून आपल्याला दुसरीकडे जायचं आहे, चल. " असें म्हणत त्या आगिनगाडीच्या एका दरवाजानें मला आंत लोटून आपणहि माझ्या-मागून आंत आले. मी हें सर्व ऑ वासूनच पाहात होतों. इतक्यांत पूर्वीप्रमाणेंच सूं ऽऽऽऽ असा कर्कश आवाज करीत ती आमच्यासह धाड्धाड् करीत पुढें चालू झाली. पुढें मोठेपणीं पुन्हां मुंबईत आलों तेव्हां तें ' दुकान ' म्हणजे चर्नी-रोड स्टेशन होय हें मला समजलें !

## गडकरी सर्द झाले !

सन १९१०।११ सालची गोष्ट. ' महाराष्ट्र-नाटकमंडळी 'चा मुक्काम पुण्याला होता. शनिवारवाड्याच्या ईशान्य कोपऱ्यांतील बुरजा-समोर एक दुमजली पश्चिमाभिमुखी इमारत आहे. तेथें मंडळीचा मुक्काम होता. दुसऱ्या मजल्यावरील सज्जालगत जें पश्चिमाभिमुख दालन आहे तें मंडळीच्या ' तालमी 'चें दालन असून आल्यागेल्यांच्या बैठकीची जागाहि तीच होती. गडकरी जवळच हल्लीं नवा पूल झाला आहे तेथें नदीकांठीं बारामतीकर काळ्यांचा जुना वाडा आहे— हल्लीं तो पूर्वाभिमुख आहे तसा नसून दक्षिणाभिमुख होता—त्या वाड्यांत राहत असत. एकीकडे त्यांचें ' प्रेमसंन्यास ' म्हणजे मुळांत ' संधिसाधन ' हें लिहिण्याचें काम चालूंच होतें. तें नाटक 'महाराष्ट्र-नाटकमंडळी'नें बसविण्यास घेतल्याकारणानें त्याच्या संबंधाच्या स्मृती पुढें येणारच आहेत. पण तो काळ मुख्यतः त्यांच्या काव्यरचनेच्या पहिल्या जोराच्या उमाळ्याचा असल्याकारणानें त्या गोष्टीचेंच सूत्र पुढें चालू होतें. त्या वेळीं त्यांनीं घरीं कविता कराव्या आणि मंडळींत येऊन त्या वाचून दाखवाव्या, आ॰ त्यांचा नित्याचा क्रम होता. मला वाटतें, त्यांच्या ' वाग्वैजयंती 'तील शेंकडा साठ-पाउणशें कविता तरी अशा रीतीनें त्या वेळीं निर्माण झालेल्या असाव्यात. याचा परिणाम असा झाला कीं, मंडळींत सर्वांच्या डोक्यांत काव्यकल्पनांचा सुळसुळाट होऊन गेला होता. मंडळीची स्नाना-च्या नंबाजवळ ठेवलेली एक फुटकी तपेली होती. तिच्यावरहि गडकऱ्यांनीं एक कविता केलेली ' वाग्वैजयंती 'त आलेली आढळून येईल. या उदा-हरणावरून काव्यकल्पनांचा सुळसुळाट कोणत्या थरापर्यंत गेलेला होता याची सहज कल्पना येण्या-सारखी आहे. माझा मुलगा चि. भाई ( त्याला बंडू असेंहि म्हणत ) त्या वेळीं ५।६ वर्षांचा होता. तो बहुतेक सारा वेळ मंडळींतच मजपाशीं असे. तो फार बोलका होता. त्यामुळें गडकऱ्यांचें व त्याचें फार मेतकूट जमलें होतें. ' वाग्वैजयंती '-मधील ' बंड्याची चित्रकला ' ही गडकऱ्यांची कविता त्या मेतकुटांतूनच निर्माण झालेली आहे. या एकंदर वातावरणामुळें त्याच्या डोक्यांतहि कांहीं कल्पना येत असत. एकदां त्यानें गडकऱ्यांना अचानक एक प्रश्न विचारला : " का हो, मास्तर, (-गडकरी किर्लोस्कर-मंडळीमध्यें मुलांना शिक-विण्यासाठीं ' मास्तर ' म्हणून ठेवलेले होते, त्या-मुळें त्यांना ' मास्तर ' हें नामाभिधान प्राप्त झालेलें होतें.-) सकाळीं सूर्य उगवला कीं काळोख नाहींसा होतो. सूर्य काय तो खाऊन टाकतो ? " हा प्रश्न ऐकून गडकरी क्षणभर स्तंभितच झाले. पण गडकरीच ते ! त्यांनीं त्याला उलट स्तंभित करण्या-साठीं प्रश्न केला : ' आणि मग मागें सांवल्या राहतात त्या ? ' पण अपेक्षेप्रमाणें स्तंभित न होतां तो सट्कन् उद्गारला : ' अहो, आम्ही भात खातांना ताटलीभोंवतीं शितं उडतात ना, तशाच त्या. ' गडकरी सर्दच झाले !

करणार

येण्याची

सर्वसामा

## पं क ल न

आणि स्वच्छ

## अरण्य-संशोधन-संस्था

त्रासाचें

तयार न

धंदा आहे

विद्यापीठतील एम्. एस्सीचे विद्यार्थी झि. पाटील हे कांहीं दिवसांपूर्वी गेले होते. डेहराडूनच्या ' अरण्य-संशोधन-संस्थे 'विषयीं त्यांनीं लिहून पाठविलेली माहिति खालीं दिली आहे :

" डेहराडून गांव विशेष मोठें नाहीं. परंतु फॉरेस्ट रिचर्स इन्स्टिटयूट किंवा अरण्य, संशोधन-संस्था-








लष्करी शिक्षणाची संस्था यांमुळें डेहराडून विशेष प्रसिद्ध आहे. आम्ही तेथें हिंवाळ्यांत गेलों होतों. हिंवाळ्यांत तेथें थंडी प्रसन्न असते. म्हणून तेथें काम करायला खूपच उत्साह वाटतो.

"ही जंगल-संशोधन-संस्था गांवाच्या बाहेर खूपच अंतरावर आहे. खूपच प्रचंड आवार या संस्थेचें आहे. संस्थेच्या ताब्यांत ११५० एकर जमीन आहे. त्यांतली २५० एकर प्रयोगासाठीं आवश्यक अशा वनस्पतींच्या बागेसाठीं (बोटॅनिकल गार्डनसाठीं) राखून ठेवली आहे. प्रत्यक्ष संस्थेची जागा सात एकरांची असून इमारती उंच आणि भव्य आहेत. येथील सर्व बांधकाम अगदीं योजनाबद्ध रीतीनें झालेलें आहे.

"या संस्थेची स्थापना १९२९ मध्येंच झाली. जंगलाला संलग्न अशा सर्व विषयांवर संशोधन करणें हें तिच्या स्थापनेचें उद्दिष्ट होय. त्या दृष्टीनें येथें लांकडाच्या विभागणीवरून सात विभाग केलेले आहेत. लांकूडकापणी, लाकूड टिकविणें, सेल्यूलोज, कागद, जंगल-तेलें इत्यादि विभाग प्रामुख्यानें त्यांत येतात. प्रत्येक विभाग अद्ययावत् सामग्रीनें सुसज्ज आहे. प्रत्येक विभागांत संशोधनाचें कार्य चालूं आहे. संशोधनाला आवश्यक म्हणून येथें वाचनालय, कीटकालय, लांकूडकापणी, वनस्पतिप्रदर्शन इत्यादि योग्य रीतीनें चालविलेलीं आहेत. येथील वनस्पति-वस्तु-संग्रहालय तर हिंदुस्थानांत एकमेवच असावें. त्यांत जंगलांतुन प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें मिळणाऱ्या सर्व वस्तूंची मांडणी केलेली आहे. येथील म्यूझियम-हि खूपच आकर्षक आहे. जंगलांतून मिळणाऱ्या कच्च्या मालालाच येथें जास्त महत्त्व आहे. येथील प्रदर्शनांत दिसणाऱ्या कागद, कापड, औषधी, वाजंत्रीं, कातडी काम, हस्तिदंत, रंग इत्यादि वस्तू जंगलाची थोरवी चांगल्या रीतीनें पटवून देतात.

"या दृष्टीनें येथील संशोधन-संस्थेचें विशेष महत्त्व आहे. देशांतील सर्व जंगलांचा सदुपयोग कसा करावा याच दृष्टीनें येथील कार्याचीं पावलें पडत आहेत. येथील तेलांच्या विभागांत सुवासिक तेलें निर्माण करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. कांहीं विशिष्ट लांकडापासून किफायतशीरपणें हीं तेलें मिळणें शक्य आहे कीं काय या दृष्टीनें येथें प्रयत्न सुरू आहेत. दुसरा महत्त्वाचा प्रश्न सध्यां वनस्पति तुपाचा आहे. त्याचें मिश्रण इतर तुपांत होऊं नये म्हणून त्याला रंग देण्याचा प्रयत्न शास्त्रज्ञ करीत आहेत. त्यासाठीं भारत सरकारनें मोठें बक्षीस लावलेलें आहे. तो प्रश्न सोडविण्यासाठीं येथील प्रयोगशाळेंत क्लोरोफिलसारख्या हरित द्रव्याचा उपयोग करीत आहेत. हें हरित द्रव्य झाडांच्या हिरव्या पानांतून खूपच प्रमाणांत मिळूं शकतें.

"येथील कागदाच्या विभागांत एक लहानशी कागदाची गिरणी आहे. तेथें निरनिराळ्या लांकडांच्या भुशापासून कागद तयार करण्याचा उद्योग चालू आहे. कागदाचा दर्जा सुधारण्याचा प्रयत्न चालू आहे. आतांपर्यंन्त केलेल्या प्रयोगांत त्यांना बांबूपासूनच चांगल्या प्रकारचा कागद मिळालेला आहे. त्याशिवाय इतर लांकडापासून कुठल्या प्रकारचे कागद मिळूं शकतात हें तुलनात्मक दृष्टीनें पाहातां येतें.

"देशांतील कानाकोपऱ्यांतुन येणारे जंगलविषयक प्रश्न येथें सोडविले जातात. लांकूड कारागिरी व लाकूड-एंजिनीअरिंग हे भाग व वर्कशा॰ बघण्यासारखे आहेत. चार-पांच तासांत बघतां येणें शक्य होतें तेवढें सर्व आम्हीं बघितलें. एवढी मोठी संस्था मीं तरी प्रथमच बघितली. प्रत्येक विज्ञानाच्या विद्यार्थ्यानें संधि मिळाल्यास ही संस्था अवश्यमेव बघावी, असें वाटतें."

## डॉ. आंबेडकर व भाषावार राज्यें

डॉ. आंबेडकर यांनीं भाषावार राज्यांसंबंधीं एक लेख कांहीं दिवसांपूर्वीं 'टाइम्स ऑफ इंडिया' (२३-४-५३) मध्यें लिहिला आहे. भाषावार राज्यांसंबंधीं देशांत खल चालू असतांना, डॉ. आंबेडकरांचा म्हणून या लेखाला विशेष महत्त्व आहे. त्या लेखाचा स्वैर अनुवाद पुढें दिला आहे :

"ब्रिटिशांपुढें कारभाराची दृष्टि होती. केवळ अगतिक म्हणून, विशिष्ट लोव, सोपे [illegible] प्रचंड होती (glaring उत्तम [illegible] म्हणूनच बंगाल, बि[illegible], [illegible]च्या [illegible]








निर्माण केले. कदाचित् ब्रिटिश पुढें येथें राहिले असते तर तर्कशुद्ध परिणति म्हणून त्या प्रांतांचीं भाषावार राज्यें त्यांना करावीं लागलीं असतीं.

" १९२० सालीं काँग्रेसनें गांधींच्या नेतृत्वाखालीं जी प्रांतरचना केली, ती घटनेनें पार पाडण्याची वेळ १९४५ सालीं, अधिकारग्रहणानंतर आली. एका सभासदानें भाषावार प्रांतरचनेचा ठरावहि आणला. त्या ठरावावर सरकारतर्फे उत्तर देण्याची जबाबदारी माझ्यावर आली. मीं साहजिकच काँग्रेस हाय कमांडला विचारलें. तें विरुद्ध होतें. शेवटीं मुख्य प्रधानांनीं आंध्रनिर्मितीबद्दल आश्वासन दिलें. पुढें हिंदी राज्यघटनेचा मसुदा तयार करीत असतांना माझ्यापुढें पुन्हां प्रश्न आला. मी त्या ड्रॅफ्ट कमिटीचा कार्याध्यक्ष होतों. म्हणून 'आंध्रचें नांव राज्यांच्या यादींत घालायचें का ' असें मीं विचारलें. त्या वेळीं नक्की काय उत्तर मिळालें तें आतां आठवत नाहीं. पण श्री. राजेन्द्रप्रसादांनीं पुढें या प्रश्नाचा विचार करण्याकरितां 'दार-कमिटी' नेमली. दुसऱ्या कोणत्या गोष्टीनें नसली तरी, महाराष्ट्र जर स्वतंत्र राज्य झालें तर त्यांत मुंबई असू नये ह्या शिफारशीमुळें तरी 'दार-समिति' आपल्या कायमची लक्षांत राहील! या दार-समितीच्या अहवालाचा विचार जयपूर काँग्रेसपुढें होऊन नेहरू, वल्लभभाई व पट्टाभि यांची समिति नेमली गेली. त्या समितीनें अशी शिफारस केली कीं, आंध्रराज्य ताबडतोब अंमलांत यावें, मात्र मद्रास शहर हें तामिळांचेंच राहावें. ही शिफारस आंध्र सभासदांना—विशेषतः श्रीप्रकाशम् यांना—मान्य झाली नाहीं व प्रकरण तेथेंच अडून राहिलें. शेवटीं श्री. पोट्टि श्रीरामुलु यांच्या प्राणांतिक प्रायोपवेशनानें आंध्र प्रांताच्या निर्मितीला तोंड फुटलें. ज्या प्रश्नाबाबत खरोखरीं काँग्रेसमध्यें एकवाक्यता होती, त्याचा निर्णय व्हायला श्रीरामुलूंना आपले प्राण वेंचावे लागावेत ही घटना राज्यकर्त्या पक्षाला लांच्छनास्पद होय. आंध्रराज्य म्हणजे [illegible] ला मुख्य प्रधानांनीं दिलेलें त्रासाचें विद्यापीठ [illegible] तयार [illegible] झि. पाठ[illegible] धंदा [illegible] गेले होते. विचार करतांना पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषिक राज्यें हीं आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी (viable) असलीं पाहिजेत. आंध्रला तर ५ कोट रुपये दर वर्षी तूट येईल असें न्या. मू. वांचूनीं म्हटलें आहे. मध्यवर्ती सरकार जर ही तूट देणार असेल, तर पुढें होणाऱ्या राज्यांचीहि तूट तें अशीच भागविणार आहे का?

" आंध्रांची राजधानी ठरली नाहीं. राजधानीशिवाय राज्य मला तरी माहीत नाहीं. श्री. राजगोपालाचार्य तर एक रात्रहि मद्रास शहर द्यायचें सौजन्य दाखवायला तयार नाहींत. हिंदु धर्माच्या आतिथ्यशीलतेला हें शोभेसें नाहीं.

" आंध्रची राजधानी सध्यांच्या हैदराबादेंतील आंध्र विभागांतील वारणगळ हें व्हावें असें वाटतें. हैदराबाद संस्थान ही एक महाभयंकर विकृति आहे. त्याचे तुकडे पाडून ती विकृति नष्ट केली पाहिजे. हैदराबादच्या बाबतींत (आणि काश्मीरच्याहि) मुख्य प्रधानांचें वागणें ईश्वरेच्छेविरुद्ध चाललें आहे. त्याचे परिणाम त्यांना लवकरच दिसतील. पण हैदराबादचे आज तुकडे पाडायला जर त्यांचा खरोखरींच प्रामाणिक विरोध असेल तर हैदराबादमधील आंध्र-विभाग हा हैदराबादच्या नियंत्रणावरून काढून घेऊन एक अलग टापू म्हणून (enclave) निर्माण करावा, तो आंध्रराज्यास जोडावा व वारणगळकरितां मार्ग मोकळा करावा असें माझें मत आहे. हें विषयान्तर झालें. पण पहिला मुद्दा हा कीं, भाषिक राज्य हें आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण पाहिजे.

" दुसरा प्रश्न हा कीं, भाषिक राज्यामध्यें अल्पसंख्यांकांचें काय होणार? दुर्दैवानें हिंदुस्थानच्या लोकसंख्येचे नक्की जातवार आंकडे अजून कोणीं काढले नाहींत. खानेसुमारीच्या आंकड्यांवरून हिंदु किती, मुसलमान किती, ज्यू किती, खिस्ती किती, अस्पृश्य किती ही धर्मविषयक माहिती मिळते खरी. पण निरनिराळ्या भाषावार विभागांत जाती किती आहेत, याचे आंकडे उपलब्ध नाहींत. पण सामान्यतः असें विधान करतां येईल कीं, प्रत्येक भाषावार विभागांत एक दोन जाती बहुसंख्य आणि प्रमुख आणि इतर थोड्या जाती अल्पसंख्य आणि वरिष्ठ जातींवर अवलंबून आहेत.








उदाहरणार्थ, पंजाबांत जाट बहुसंख्य व प्रबळ असून, अस्पृश्यसमाज त्यांच्यावर अवलंबून आहे. आंध्रामध्यें रेड्डी किंवा कम्म आणि कप्पू हे बहुसंख्य असून त्यांच्याच हातीं सर्व जमीन, अधिकाराच्या जागा आणि व्यापार आहे. तेथील अस्पृश्यांचें जिणें सर्वस्वीं त्यांच्यावर अवलंबून आहे. महाराष्ट्रांत मराठासमाज बहुसंख्य व प्रमुख असून त्यांच्या मानानें ब्राह्मण, गुजर, कोळी आणि अस्पृश्य यांना गौण स्थान आहे. गांधी-हत्येनंतर ब्राह्मण आणि गुजर हे खेडीं सोडून शहरांत गेले. आतां फक्त बिचारे अस्पृश्य, कोळी आणि माळी हेच खेड्यांतून मराठ्यांचा जुलूम सहन करायला उरले आहेत.

" म्हणून भाषावार राज्यरचनेंत ह्या अल्पसंख्यांकांची स्थिति काय होणार आहे ? कधीं तरी निवडून यायची त्यांना आशा आहे का ?—याचा अर्थ हाच कीं भाषावार राज्यें हीं बहुसंख्य जातींचीं राज्यें होणार. हाच प्रश्न निराळ्या तऱ्हेनें स्पष्ट शब्दांत मांडावयाचा तर यांना भाषिक राज्यें म्हणण्याऐवजीं हीं राज्यें जाटराज्य, मराठाराज्य, रेड्डीराज्य अशीं संबोधावीं लागतील.

" तिसरा प्रश्न असा कीं, भाषावार राज्यांतून ती भाषा बोलणारे झाडून सर्व लोक एकत्र आलेच पाहिजेत का ? युक्त प्रांतामध्येंच सर्व हिंदीभाषी लोक आले आहेत त्याप्रमाणें सगळे महाराष्ट्रीय महाराष्ट्रांतच, सगळे आंध्र आंध्रराज्यांतच असावेत का ? अशा प्रकारें भाषिकांचे एकत्र गट ( consolidation ) करण्यानें इतर भाषिक राज्यांविरुद्ध भावना चेतविली जाणार नाहीं का ? अशा प्रकारच्या भाषिक एकत्रीकरणानें जर वेगळे-पणाची भावना परिपुष्ट होणार असेल, तर प्राचीन काळीं मौर्यसाम्राज्य मोडल्यानंतर जशी हिंदुस्थानची स्थिति झाली, तशी स्थिति पुन्हां निर्माण होईल. नियतीचा फेरा पुन्हां तसा उलटणार आहे का ?

" याचा अर्थ असा नव्हे कीं, भाषावार राज्यरचनाच नको. भाषावार राज्यांतील बहुसंख्याक जातींकडून आपल्या अधिकाराचा दुरुपयोग होऊं नये याकरितां समतोल साधणारीं नियंत्रणें ( checks and balances ) पाहिजेत हेंच पटविण्याचा माझा उद्देश आहे. "

### श्री. मामा वरेरकरांची सप्तत्यब्दपूर्ति

मराठी साहित्यांत **श्री. मामा वरेरकर** यांचें स्थान फार उच्च आहे. त्यांच्या व्यक्तित्वांत अशीं कांहीं परस्परविरोधी वैशिष्ट्यें आहेत कीं, त्यामुळें त्यांचें व्यक्तित्व वैचित्र्यपूर्ण वाटतें. परंतु त्यांनीं मराठी साहित्याची केलेली सेवा अपूर्व आहे. पट्टीचे नाटककार, कादंबरीकार, उत्तम भाषांतरकार या नात्यानें झालेलें त्यांचें कार्य अविस्मरणीय आहे. स्वच्छ व शुद्ध मराठीची शैली त्यांच्या 'सत्तेचे गुलाम' यासारख्या नाटकांत आणि 'चिमणी'सारख्या कादंबऱ्यांत जशी आढळते तशी ती इतरत्र क्वचितच आढळेल. अशा या चतुरस्र साहित्यिकाचा एक्काहत्तरावा वाढदिवस नुकताच साजरा झाला. त्या निमित्तानें कवि मंगेश पाडगांवकर यांनीं एक लेख 'साधने'त ( २ मे ) लिहिला आहे. त्यांतून पुढील महत्त्वाचा भाग उद्धृत केला आहे :

" साहित्याच्या सर्व क्षेत्रांत मामांनीं आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटविला. लघुकथांपासून रहस्यकथांपर्यंत, कादंबरी-नाटकांपासून तों थेट बोलपट-कथानकापर्यंतच्या सर्व प्रांतांत मामांनीं यशस्वी रीतीनें वाटचाल केली ! मामांनीं कविता-सुद्धां लिहिल्या ( आणि त्याहि मुक्तछंदांत ! ). पत्रकार म्हणूनहि मामांनीं लेखन व संपादन केलें. 'पौर्णिमा', 'शिलेदार' हीं साप्ताहिकें त्यांनीं चालविलीं. एरव्हीं मामांच्या वाङ्मयांत शिवराळ-पणा कोठेंहि नाहीं, परंतु आपल्या वर्तमानपत्री लिखाणांत पुष्कळ वेळां त्यांनीं ही 'उणीव' भरून काढली ! वर्तमानपत्रांत प्रचारासाठीं त्यांनीं खूप लिहिलें तसें प्रचाराच्या हिरीरींत विपर्यस्त लिखाणहि त्यांच्या हातून झालें.

" मामांच्या प्रतिभेचें आणि व्यक्तित्वाचें उज्ज्वल दर्शन प्रामुख्यानें त्यांच्या नाटकांतच होतें. वरेरकर म्हणजे नाटककार वरेरकर असेंच समीकरण जणुं झालें आहे. सुबोध, सोपें मराठी कसें लिहावें याचें उत्तम वरेरकरांचें साहित्य. मामांच्या








माणसांसारखीं बोलूं लागलीं. नाटक हें जीवनाचें चित्र आहे याचा अनुभव मामांचीं नाटकें पाहत असतांना प्रेक्षकाला येऊं लागला. कृत्रिम आलंकारिकतेचा त्याग केलेली मामांची शैली मराठी साहित्याचें लेणें ठरली. नाटकाच्या तंत्रांतहि मामांनीं फार क्रांति केली. एकांकिकेसारखे नवनवे प्रयोग त्यांनीं केले.

" सर्वसामान्य माणूस ही मामांच्या वाङ्मयाची मुख्य प्रेरणा. त्याच्या जीवनाविषयीं मामांना विलक्षण प्रेम. त्याच्या सुखासमाधानाची त्यांना विलक्षण तळमळ. या सामान्य माणसाच्या जीवनाला कांचणाऱ्या, त्याच्या विकासाचें शोषण करणाऱ्या रूढिरिवाजांविरुद्ध लेखणीचें शस्त्र करून मामा उभे राहिले. हुंड्याच्या दुष्ट रूढीवर आपल्या 'ह्याच मुलाचा बाप' या नाटकांतून त्यांनीं खड्ग चालविलें. 'सोन्याचा कळस' हें मजुरांच्या प्रश्नावरचें पहिलें नाटक त्यांनीं लिहिलें. नौखालीच्या दुःखावर प्रकाश टाकणारें 'अपूर्व बंगाल' हें नाटक नुकतेंच त्यांनीं लिहिलें आहे. पुरुषाच्या अरेरावीविरुद्ध बंड करणारी (कांहीं वेळां जरूर नसतांना तर कांहीं वेळां जरूरीपेक्षां अधिकसुद्धां !) स्त्री मामांनीं आपल्या साहित्यांत निर्माण केली. मामांच्या साहित्यांतलीं पात्रें (त्यांच्यासारखींच) लढल्याझगडल्या-खेरीज जगूंच शकत नाहींत. संघर्ष मामांच्या सर्व साहित्यांत भरून राहिला आहे. नदीच्या पात्रा-सारखें संथ सखोल, क्षोभ न करतां अंतर्मुख करणारें, मानवी जीवनांतल्या गूढतेचा स्पर्श करणारें, असें विश्व मामांच्या वाङ्मयांत शोधूनहि सांपडणार नाहीं. हें मामांचें वैगुण्य आहे, असा याचा मुळींच अर्थ नाहीं. मामांच्या सामर्थ्यांतूनच निर्माण झालेली ही एक सीमारेषा आहे असें म्हटलें तर चालेल. मामांच्या सर्व वाङ्मयांत एक हिरीरी आहे, आवेश आहे. कांहीं वेळां प्रचाराच्या आकसामुळें आवेशाचा अभिनिवेश झाल्याचें जाणवतें. हें जाणवत असलें तरी तेवढें खटकत नाहीं आणि याचें कारण मामांच्या लेखनामागची त्रासाचें [illegible] वाटते, उत्कट वाटते, हेंच होय. तयार [illegible] [illegible]विश्व त्यांनीं मराठींत आणलें. [illegible] आ[illegible] गे[illegible]च्या सहृदयतेनें त्यांनीं अनुवाद केला; परंतु मामांची प्रवृत्ति आणि प्रकृति शरद्बाबूंपेक्षां किती तरी भिन्न आहे हें जाणवल्या-शिवाय राहत नाहीं. प्रखर वैचारिकता हीच मामांच्या साहित्याची बैठक आहे. भावना त्यांच्या वाङ्मयांत अंग चोरूनच वावरते; अर्थात् याला कांहीं अपवाद आहेत. कसल्या तरी गूढ संवेदनेनें शरद्बाबू माणसांच्या व्यक्तित्वाचें रहस्य हेरतात. त्यांत बराचसा भाग असा असतो कीं, जो विचारांच्या सांच्यांत बसवितां आला नाहीं तरी भावनेला जाणवतो. याच्या उलट मामांच्या बहुतेक वाङ्मयांत कसल्या तरी हक्कासाठीं वा अन्याया-विरुद्ध बुद्धिवादाचें शस्त्र घेऊन केलेला संग्राम जाणवतो. सामाजिक प्रगतीचा गाडा पुढें ढकलण्या-साठीं लावलेला नेट त्यांत प्रकर्षानें जाणवतो. पण भावनेची उत्कटता त्यांत कमीच वाटते. मामांची प्रतिभा चिरतरुण आहे. त्यांनीं लिहिलेलीं नवीं पांच नाटकें मराठी साहित्याचीं भूषणें अशींच आहेत.

" एवढ्या मोठ्या लेखकाला आज वयाच्या सत्तराव्या वर्षी उपजीविकेचा प्रश्न पडावा याचें दुःख वाटतें. सत्तराव्या वर्षी बरगड्यांत प्लूरसीचें दुखणें बाळगून पोटासाठीं रहस्यकथा डिक्टेट करणारे मामा डोळ्यांसमोर उभे राहिले कीं आंतडें तुटतें ! "

## संस्कार आणि सद्ग्रंथ

गुजरातमध्यें ३ ऱ्या पुस्तकालयपरिषदेचें अधिवेशन नुकतेंच झालें. अध्यक्षस्थानीं सुप्रसिद्ध विचारवंत श्री. केदारनाथजी हे होते. त्यांच्या भाषणाचा मुख्य भाग 'शिक्षण अने साहित्य' मासिकावरून पुढें दिला आहे :

" मानवजातीच्या सुधारणेसाठीं शिक्षण आणि सुसंस्कार यांची किती जरूरी आहे तें मानवजातीच्या अभ्यासावरून आपल्या ध्यानीं येऊं शकतें. अगदीं प्राथमिक अवस्थेंत मनुष्य-प्राण्याची काय स्थिति असेल, ते आपले परस्पर-व्यवहार कशा तऱ्हेनें चालवीत, हें आपणांला माहीत नाहीं; तरी पण आपले भाव, इच्छा आणि हेतु दुसऱ्यांना कळावेत म्हणून माणूस आपल्या निरनिराळ्या इंद्रियांचा उपयोग जसजसा








करूं लागला तसतसा त्या इंद्रियांच्या शक्तींचा विकास होऊं लागला, आणि त्यामुळें माणसें एकमेकांचे भाव, इच्छा व हेतु स्पष्टपणें समजूं लागलीं. त्या योगें त्यांचे अन्योन्य संबंध वाढत गेले असतील आणि एकमेकांच्या सहकार्याबरोबर प्रेम, प्रेमानंतर विश्वास, अशा तऱ्हेनें एकामागून एक सद्‌गुणांचा विकास मानवजातींत होत गेला असला पाहिजे. त्यामुळें मानवजात अधिकाधिक सामुदायिक तऱ्हेनें राहूं लागली असेल आणि मग तिला व्यवस्थित समाजाचें रूप प्राप्त झालें असेल. या सर्व क्रमांत माणूस केव्हां तरी आपले भाव, इच्छा व हेतु व्यक्त करण्यासाठीं जीभ व ओठ यांचा उपयोग करूं लागला असावा व तेव्हांच शब्द निर्माण झाला असावा. यांतून भाषेचा उपयोग करण्याची स्थिति आली असावी व त्यानंतर विकास होत होत भाषाशास्त्र तयार झालें असावें. त्यानंतर वाचेबरोबरच इतर इंद्रियांची शक्ति व बुद्धि यांचाहि विकास होऊन त्यांतून अक्षरांना–उच्चारांच्या खास चिन्हांना-रेषांनीं व संकेतांनीं व्यक्त करण्याची कला निर्माण झाली असावी. त्यालाच ' लिपि ' अशी संज्ञा प्राप्त झाली आहे.

" अशा प्रकारें माणूस भाषा शिकला, ती लिपिबद्ध करायचेंहि तो शिकला व त्यायोगें त्याच्या अन्य कार्यप्रवृत्तींना गति मिळाली. आज जगांतून लिपि नाहींशी झाली तर आपली काय दशा होईल ? अशा स्थितींत कदाचित् मानवी सद्‌गुणांचा नाश होऊन आपण पूर्ववत् जंगली अवस्थेला पण जाऊं !...

" म्हणून मानवजातीचा उत्कर्ष आणि उन्नति व्हावी अशी आपणा सर्वांची इच्छा असल्यास आपणा सर्वांना भाषा व लिपि यांचें ज्ञान असलें पाहिजे. तरी पण मानवजीवनाचा अभ्यासक व मानवतेचा उपासक या दृष्टीनें मला एवढें माहीत आहे कीं, ज्याप्रमाणें आरोग्याचा आग्रह ठेवणारा केवळ पोटभर खायला मिळावें एवढ्यावरच लक्ष ठेवीत नाहीं, तर काय खावें, प्यावें व तें कसें पचवावें इकडे अधिक लक्ष देतो, त्याप्रमाणें लोकांत आज जी वाचनाची प्रवृत्ति व लेखनाची प्रवृत्ति वाढते आहे, ती समाजाला सुसंस्कृत व सद्‌गुणसंपन्न करण्याकडे किती उपयोगी पडेल व मानवतेची सिद्धि हा जो जीवनाचा मुख्य हेतु, तो प्राप्त करण्याकडे ती किती मदत करील, याकडे मानवतेचा उपासक लक्ष देत असतो.

" महान् बुद्धिमान् इसाप याच्या चारित्रांत एक गोष्ट आहे. इसापला कांहीं मित्रांनीं विचारलें, ' या जगांत सर्वांत अधिक वाईट वस्तु कोणती आहे ? ' इसापनें उत्तर दिलें, ' जीभ '...पुढें एकदां त्याच मित्रांनीं विचारलें, ' इसाप, जगांत सर्वांत चांगली वस्तु कोणती आहे ? ' इसापनें उत्तर दिलें, ' जीभ '. याप्रमाणें माणसांत असलेल्या शक्तीचा सदुपयोग किंवा दुरुपयोग होऊं शकतो...राष्ट्र सामर्थ्यवान् व चारित्र्यसंपन्न करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. या प्रयत्नाचें महत्त्वाचें साधन शिक्षण व सुसंस्कार आहेत व त्यासाठीं पुस्तकें फारच उपयोगी आहेत. पुस्तकालयांसारख्या संस्थांची म्हणूनच फार जरूरी आहे. तें ज्ञानप्रसाराच्या सामुदायिक प्रयत्नाचें एक अंग आहे. तें अंग सर्व प्रकारें उपयुक्त, निर्दोष व कार्यक्षम करणें हें आपणा सर्वांचें कर्तव्य आहे... "

**प्रो. सी. इ. एम्. जोड**

इंग्लंडमधील एक विख्यात तत्त्वज्ञ, प्राध्यापक आणि ग्रंथकार प्रो. जोड नुकतेच खिस्तवासी झाले. आधुनिक काळांतील वेगवेगळे वाद व तत्त्वप्रणाली सोप्या शैलींत स्पष्ट करून लोकप्रिय करण्याचें फार महत्त्वाचें कार्य प्रो. जोड यांनीं केलें. भारतीय तत्त्वज्ञानाकडेहि त्यांचें लक्ष गेलेलें होतें. त्यांच्या वैशिष्ट्यांचें मूल्यमापन करणारें भाषण प्रसिद्ध तत्त्वज्ञ प्राध्यापक **प्रो. ए. आर. वाडिया** यांनीं मुंबई रेडिओकेंद्रावरून कांहीं दिवसांपूर्वी केलें तें ' इंडियन लिसनर 'च्या मे २४ च्या अंकांत आलें आहे. त्यांतून महत्त्वाचा भाग पुढें उद्धृत केला आहे :

" सॉक्रेटिसानें तत्त्वज्ञान आकाशांत होतें तें जमिनीवर आणलें, असें अभिमानपूर्वक म्हटलें जातें. ' आपण जगांतील तत्त्वज्ञान पसरविण्यासाठी आकाशाचा उपयोग केला ' असें प्रो. [illegible] म्हटलें असतें तर तेंहि योग्य [illegible] जगाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत प्रो.

पोंचविण्याचें श्रेय बी. बी. सी. या इंग्लिश रेडिओकेंद्राला आहे. बी. बी. सी. वरील ' ब्रेन ट्रस्ट 'नामक बौद्धिक जिज्ञासापूर्तीचा कार्यक्रम यशस्वी होण्यामागें प्रो. जोड यांची बुद्धि व जिज्ञासावृत्ति प्रमुख होती.

" प्रो. जोड यांची लेखणी बहुप्रसू होती. ते रसेलचे अनुयायी होते. त्यांनीं वास्तववादाचा पुरस्कार केला होता व वैज्ञानिक वृत्तींशीं वास्तववादच सयुक्तिकपणें संबद्ध आहे असें त्यांचें मत होतें. वास्तववादावरूनच निरीश्वरवादाकडे जाणें सोपें व स्वाभाविक होतें. त्यांचे नीतिविषयक विचार व त्यांतहि वैवाहिक नीतिविषयक विचार रूढ विचाराला पटणारे नव्हते. बी. बी. सी. वरून हे विचार प्रसृत करावयाची संधि त्यांना सुदैवानें प्राप्त झाली आणि इंग्लिशभाषी जगांतील सर्वात अधिक प्रसिद्ध व लोकप्रिय तत्त्वज्ञानी म्हणून ते मान्यता पावले.

" दुसऱ्याचे कठिण विचारहि अत्यंत सोप्या व साध्या शैलींत मांडण्याची अपूर्व कला प्रो. जोड यांना साध्य झाली होती. ' आयडियालिस्ट थीअरी ऑफ स्टेट् ' यासारखा गुंतागुंतीचा विषयहि त्यांच्या लेखणीनें सहजीं उलगडवून दाखविला आहे. तसेंच ' आधुनिक व्यक्तिवाद ' आणि ' समाजवाद ' यांच्या विविध प्रकारांचें दर्शन त्यांनीं अत्यंत अचूकपणें घडविलें आहे. त्यांचे राजकीय तत्त्वविचार उत्क्रान्तिनिष्ठ समाजवादाच्या दिशेनें वळले, क्रांतिकारक साम्यवादाकडे नव्हे. आध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या बाबतींत ते ब्रिटिश प्रत्यक्षवादी तत्त्वज्ञानाचे अनुयायीच राहिले. जगांतील आदर्शवादी आध्यात्मिक विचारांचा त्यांच्या बुद्धीवर फारसा परिणाम झाला नाहीं. शास्त्रीय प्रगतीच्या वातावरणांत वागणाऱ्या त्यांच्या मनाला तत्त्वज्ञानाच्या प्रश्नांकडे शास्त्रज्ञाच्या नजरेनें पाहणें आवडावें हें स्वाभाविकच होतें. म्हणूनच ते निरीश्वरवादीहि झाले आणि ख्रिस्ती धर्मांतील नीतिवादापासून ते दूर दूर गेले.

" त्यांच्या विविध ग्रंथांपैकीं ' Matter, Life and Value ', ' Aspects of Modern Science ' आणि 'God and Evil' या ग्रंथांत त्यांचे तत्त्वज्ञानविषयक विचार उत्तमपणें प्रकट झाले आहेत. आपणा भारतवासीयांना खूप आवडण्यासारखा त्यांचा ग्रंथ म्हणजे ' Counter-attack from the East ' हा होय. आपले उपराष्ट्राध्यक्ष डॉ. राधाकृष्णन् यांच्या तत्त्वज्ञानासंबंधीं तो आहे. डॉ राधाकृष्णन् यांच्याविषयींचा हा पहिला मोठा ग्रंथ होय व तो १९३३ सालीं प्रसिद्ध झाला. राधाकृष्णन् यांची आदर्शवादी विचारसरणी प्रो. जोड यांच्या स्वतःच्या वास्तववादी विचारसरणीहून दोन ध्रुवांइतकी दूर असूनहि त्यांनीं त्यांच्याविषयीं ग्रंथ लिहावा यांत प्रो. जोड यांचा मानवतावादच उत्कृष्टपणें प्रतीत होतो. या ग्रंथांत जरी संशयवादी वृत्ति, सूक्ष्म व्याजोक्ति हीं असलीं तरी त्यांच्या लेखनामागें राधाकृष्णन् यांच्याविषयींची प्रशंसाबुद्धिच आहे, यांत शंका नाहीं. आणि अशी ही जरा तर्काला न पटणारी वृत्ति घडून येण्याचें कारण राधाकृष्णन् यांचें आकर्षक व्यक्तित्वच होय. शिवाय, आधुनिक पाश्चिमात्य सुधारणेच्या अंगांत कोणता विषारी कांटा रुतलेला आहे तें प्रो. जोड यांना समजलेलें होतें. त्यांनीं धैर्यानें हा रोग दिग्दर्शित केलेला आहे : ' श्रद्धेच्या बाबतींत संशयी वृत्ति, वर्तनाच्या बाबतींत ढोंगी वृत्ति, मूल्यविषयक भावनेबाबत उदासीनपणा ' असें त्यांनीं म्हटलें आहे. राधाकृष्णन्नीं पाश्चिमात्यांच्या या तऱ्हेच्या वृत्तीचा निषेध आपल्या काव्यमय शैलींत केलेला आहे. पाश्चिमात्यांची प्रत्यक्षवादी सुधारणा आणि पौर्वात्यांची अध्यात्मवादी विचारणा यांच्यामधील खिंड भरून काढणारा पूल म्हणून प्रो. जोड राधाकृष्णन् यांच्याकडे पाहतात. अशा तऱ्हेची ही वृत्ति खरी मानवतावादी आहे. भारतीय तत्त्वज्ञान व जनता यांच्याबद्दल जिव्हाळा असलेला असा हा तत्त्वज्ञ आपणामधून गेला आहे. "

---






Regd. No. B. 5177

## आमचें नवें प्रकाशन

खलील जिब्रानकृत

# हिरे आणि हिरकण्या

अनुवादक : श्रीपाद जोशी

या सुंदर गद्यकाव्याच्या संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत आचार्य भागवत म्हणतात : "........ तो सौंदर्यदर्शी कलावंत होता हें खरें; पण त्याच्या सौंदर्याची कल्पना मोहकतेला भेदून जीवनाच्या सत्स्वरूपापर्यंत पोहोंचलेली आहे."

आपल्या प्रतीसाठीं आजच लिहा : मूल्य १।। रुपया

याशिवाय, जिब्रानचीं खालील पुस्तकें आम्हीं प्रकाशित केलेलीं आहेत :

| | | |
|---|---|---|
| १. | जीवन-दर्शन ( सचित्र चतुर्थावृत्ति ) | रु. २।। |
| २. | प्रवासी | रु. २ |
| ३. | पैगंबराचा बगीचा | रु. १।। |

---

आचार्य जावडेकर यांचा ग्रंथराज

# आधुनिक भारत

— लवकरच प्रकाशित होत आहे —

सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति

पृष्ठें डेमी ६५० : मूल्य १२।। रुपये

आपल्या प्रतीसाठीं आजच नांवें नोंदवा.

• • •

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २




